# In Memory of



**The Founder of the well Known firm of Messrs Ramchandra Govind & Son.**

*By the Publisher.*

# मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि.

( कै. रा. ब. म. गो रानडे यांच्या इंग्रजी लेखावरून )


लेखकः—

चिंतामण नीलकंठ जोशी. एम. ए. एस्. टी. सी.



प्रकाशकः—

डी. महादेव.






आवृत्ति पहिली.




**किंमत ४ आणे.**

(*) The Miscellaneous writings PP 28-56.

## प्रस्तावना.

गेल्या आक्टोबरमध्यें आकोला येथें भरलेल्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनांत रा. ब. महाजनींनीं केलेल्या सूचनेवरून कै० रा० ब० महादेव गोविंद रानडे यांच्या (*) 'A Note on the growth of Marâthi Literature' या लेखावरून हें लहानसें पुस्तक लिहिलें आहे. या पुस्तकांत सन १८१८ ते १८९६ पर्यंत छापून प्रसिद्ध झालेल्या मराठी वाङ्मयाचें समालोचन आलें आहे. ह्या अल्प प्रयत्नास महाराष्ट्रभाषारसिकांकडून योग्य आश्रय मिळाल्यास १८९६ ते १९१३ पर्यंतच्या राहिलेल्या मराठी वाङ्मयाचें समालोचन स्वतः करण्याचें आह्मी योजिलें आहे.

प्रस्तुत पुस्तक लिहिण्याची श्रीमती रमाबाईसाहेब रानडे यांनीं परवानगी दिल्याबद्दल त्यांचे, व रा. ब. रानडे यांचा सदरहू इंग्रजी लेख मोठ्या आनंदानें दिल्याबद्दल रा. रा. वासुदेवराव वामन ठाकूर बी. ए. यांचे आह्मी अत्यंत आभारी आहों.

भाईजीवनजीची गल्ली,
**मुंबई, नं. २**
ता. १०–७–१३

**पुस्तककर्ता.**

# मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि.

## भाग १ ला

### प्रस्तावना.

सन १८६३ सालीं ग्रेटब्रिटन आणि आयर्लंड येथील रॉयल एशियाटिक सोसायटीचे डायरेक्टर व व्हाईस प्रेसिडेंटस् यांनीं त्यावेळच्या हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरी साहेबांस एक पत्र लिहून अशी गोष्ट त्यांच्या नजरेसमोर आणिली कीं अलीकडे हिंदुस्थानांतील लोकांनीं अंशतः पुरातन संस्कृत वाङ्-मयांतील पुष्कळ ग्रंथ प्रकाशित करून, अंशतः इंग्रजी व संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें आपल्या मातृभाषेंत करून आणि अंशतः राजकीय, शास्त्रीय व धार्मिक विषयांवर स्वतंत्र पुस्तकें लिहून विद्याव्यासंगांत आपली बरीचशी तत्परता व्यक्त केली आहे. ह्या पुस्तकांची संख्या मोठी असून त्यांपैकीं पुष्कळ महत्त्वाचींही आहेत; तरी पण ह्यांपैकीं यूरोपीय पंडितांस फारच थोडीं उपलब्ध असतात. तेव्हां आम्हीं अशी सूचना करितों कीं ही हकीकत हिंदुस्थानांतील अधिकारी वर्गास कळवून आजपर्यंत निघालेल्या पुस्तकांचा कॅटलॉग प्रसिद्ध करण्यास त्यांस हुकूम द्यावा व यापुढें हिंदुस्थानांतील देशी भाषांत जीं जीं पुस्तकें व पत्रकें छापलीं जातील त्यांच्या नांवाचीं परिशिष्टें प्रत्येक तिमाहीस प्रसिद्ध करून त्या कॅटलॉगास जोडवावीं. त्याबरहुकूम स्टेट सेक्रेटरी साहेबांनीं हिंदुस्थान सरकारला एक खलिता पाठविला; व हिंदुस्थान सरकारनें स्थानिक अधिकाऱ्यांस तशा तऱ्हेचा सन १८६४ सालपर्यंतचा कॅटलॉग प्रसिद्ध करण्यास सांगून त्यांस पुढें निघणाऱ्या पुस्तकांची त्रैमासिक याद जोडण्याचा हुकूम फर्माविला. या सुमारास सर अलेक्झांडर ग्रांट हे विद्याधिकारी झाले व त्यांच्या हुकुमान्वयें १८६४ सालापर्यंत छापलेल्या संस्कृत, मराठी, गुजराथी, कानडी, सिंधी, हिंदुस्थानी व फारशी पुस्तकांचा पहिला कॅटलॉग तयार केला गेला. मराठी कॅटलॉग तयार करण्याचें काम त्यांच्या वरिष्ठांनीं न्या. रानडे यांजकडे सोंपविले होतें. त्यांनीं हें काम करून, आणखी त्या कॅटलॉगांत ज्या काळापर्यंत पुस्तकें आलीं होतीं त्या काळांत मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि सर्व दिशेनें कसकशी होत गेली होती ह्याचेंही

पर्यालोचन केलें. ही विद्याविषयक चळवळ हळुहळू कशी जोरावत गेली व ग्रंथरूपानें ती प्रारंभापासून कशी फलद्रूप होत गेली हें त्या अहवालांत त्यांनीं क्रमशः सिद्ध केलें. या कॅटलॉगावरून असें दिसून येईल कीं इंग्रजीच्या पहिल्या दहा वर्षांच्या अमदानींत म्हणजे सन १८१८ ते १८२७ च्या दरम्यांन फक्त तीन मराठी पुस्तकें बाहेर पडलीं. हीं तीन्ही पुस्तकें गणित विषयावर असून तीं कर्नल जर्व्हिस साहेबांनीं आपल्या विद्यालयांतील छात्रवर्गाच्या उपयोगासाठीं भाषांतररूपानें लिहीलीं होतीं.

पुढील दशकांत ह्मणजे सन १८२७ ते १८३७ मध्यें दहा पुस्तकें प्रसिद्ध झालीं असें या कॅटलॉगावरून दिसून येतें. त्यांतील दोन पुस्तकें 'औषधी व त्यांचे गुणदोष' आणि 'रोग निदान शास्त्र' या वैद्यक विषयांवर असून तीं डॉ. माक्कीमन यांनीं लिहिलीं होतीं. 'भूमिति' व 'भूगोल' या विषयांवर बाळशास्त्री जांभेकर यांचीं शालोपयोगी पुस्तकें ६, दादोबा पांडुरंग यांचें व्याकरण १, व हरि केशवजी यांचें सृष्टिशास्त्रावर १, जगन्नाथ शास्त्री व इतर दुसरी सरकारी नोकर मंडळी यांनीं इंग्लिश कामगारांच्या देखरेखीखालीं तयार केलेला मराठी कोश व पुढें कांहीं कालानें झालेला मोलस्वर्थ साहेबांचा मराठी—इंग्रजी कोश हे या कालांतील नांवाजण्यासारखे ग्रंथ होत.

१८३७ ते १८४७ च्या तिसऱ्या दशकांत तीस पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं ह्या कॅटलॉगांत आढळतात. बाळशास्त्री जांभेकर यांचा 'हिंदुस्थानचा इतिहास, हरिकेशवजी यांचीं 'ज्योतिष' व 'रसायनशास्त्र' अशीं दोन पुस्तकें, कर्नल जर्व्हिस यांचें 'महत्वमापन' आणि मागील दशकांतल्याप्रमाणें लहान लहान नीतिविषयक कित्येक शालोपयोगी पुस्तकें हे ग्रंथ या दशकांत येतात. सदाशिव काशिनाथ छत्रे यांची 'इसापनीति' व 'बाळमित्र' हीं पुस्तकें याच सुमारास प्रसिद्ध झालीं. यावेळीं ग्रंथप्रकाशक जुनी मराठी कविता स्वतंत्ररीतीनें पहिल्यानेंच छापूं लागले ही मोठी आनंदाची गोष्ट होय. मूळ गीतेसहित सार्थ ज्ञानेश्वरी, रामविजय, हरिविजय, रुक्मिणीस्वयंवर, हिंदुकायद्याचीं पुस्तकें वगैरे ग्रंथ याकाळीं प्रथमच छापून निघाले. ह्या प्रकाशित केलेल्या पुस्तकांशिवाय व भाषांतरांशिवाय या काळांत देशी पंचांग छापण्यासही सुरुवात झाली. त्याचप्रमाणें 'नॅचरल थिऑलजी' ( सृष्टिनिरीक्षणजन्य ईश्वरविज्ञान. ) आणि पिलग्रिमस् प्रोग्रेस ( पाथिकप्रवास ) ह्या पुस्तकांचीं भाषांतरें मिशनरी संस्थां-

शीं संबंध नसलेल्या माणसांनीं स्वतंत्ररीतीनें केलीं. या काळाच्या अखेरीस ह्मणजे सन १८४७ या वर्षी मेजर क्यांडी यांचा थोरला व श्रीकृष्णशास्त्री तळेकर यांचा लहान असे दोन मराठी कोश प्रसिद्ध झाले. यावरून पहिल्या दोन दशकांपेक्षां या दशकांत मराठी वाङ्मयाचें पाऊल निःसंशय पुढें पडलें असें कोणालाही दिसून येईल.

पुढील दहावर्षांत १०२ पुस्तकांची भर या कॅटलॉगांत पडली; मागील दशकांत सुरू झालेलें मराठी कवींचीं काव्यें छापण्याचें काम सर्वांस वाटत होतें त्याप्रमाणें चालू राहून अधिक झपाट्यानें होऊं लागलें. शालोपयोगी पुस्तकें जरी पूर्वीप्रमाणेंच निघत होतीं तरी प्रौढ वाचकवर्गासाठीं जीं पुस्तकें निर्माण होत त्यांच्या संख्येच्या मानानें तीं फारच थोडीं असत. भर्तृहरीचें शतकत्रय व हितोपदेश हे ग्रंथ सार्थ प्रसिद्ध झाले; आणि विदुरनीतीचें भाषांतरही छापलें गेलें. गणेशशास्त्री लेले यांचे क्यापटन कुक यांचे चरित्र, महादेवशास्त्री कोल्हाटकर यांचें कोलंबसाचें चरित्र, कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें साक्रेटिसाचें चरित्र, भवानी विश्वनाथ कानविंदे यांचें 'बर्थहोल्ड' ( Berth hold ) चें भाषांतर, रावसाहेब मंडलीककृत एलिफन्स्टनच्या इतिहासाचें भाषांतर, ग्रांटडफच्या इतिहासाचें भाषांतर, क्यापटन माकडोनाल्डनें केलेल्या नाना फडणविसाच्या चरित्राचें निनांवी भाषांतर; आणि केरो लक्ष्मण छत्रे याचें 'सृष्टिशास्त्र' ( Natural Philosophy ) वगैरे ग्रंथ इंग्रजींतून भाषांतर रूपानें आह्मांस प्राप्त झाले. कृष्णशास्त्री भाटवडेकरांचें आगगाड्यांवरील पुस्तक, कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें अर्थशास्त्र, गोविंद गंगाधर फडके यांचा 'आत्म्याचें अमरत्व' या विषयावरील निबंध, रेव्हरेन्ड बाबा पदमनजीची 'गृहसुधारणा ( Domestic Reform ), सादीच्या एका फारशी ग्रंथाचें निनांवी भाषांतर, गोविंद गंगाधर फडके यांचें 'यंत्रशास्त्र' वगैरे पुस्तकांवरून त्यावेळीं स्वतंत्र ग्रंथही निर्माण होऊं लागले होते हें सिद्ध होतें.

सन १८५७ ते १८६४ पर्यंतचा काळ हा चौथा भाग होय. यावेळीं मराठी ग्रंथकार व भाषांतरकार यांजमध्यें जी विलक्षण विद्याजागृति झाली तिच्या योगानें हा काळ फारच प्रसिद्ध झाला आहे. या आठ बर्षांत कॅटलॅगांत नमूद केलेल्या ग्रंथाची संख्या जवळ जवळ ५५० आहे. जुनी कविता प्रसिद्ध करण्याच्या कामांत या पांचव्या दशकाची मागील दशकांवर सरशी

आहे एवढेंच नव्हे तर १८६४ ते १८९४ पर्यंतच्या तीस वर्षांत जे कांहीं प्रयत्न या बाबतींत झाले आहेत त्यावरही त्याची सरशी आहे असें ह्मणण्यास फारशी हरकत नाहीं. या काळांत माधव चंद्रेबांनीं आपल्या सर्वसंग्रहद्वारा मोरोपंताचीं आर्यभारताचीं १८ ही पर्वें छापून काढलीं, केकावलि, मदालसा, सप्तशती, कृष्णविजय वगैरे मोरोपंताचे इतर ग्रंथही याचवेळीं प्रसिद्ध झाले. त्याच प्रकाशकानें मुक्तेश्वरच्या ओवींबद्ध भारताचीं आदिपर्व व सभापर्व अशीं दोन पर्वें आणि रामायण हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं.

इतर प्रकाशकांनीं वामन पंडिताचे यथार्थदीपिका, गजेंद्रमोक्ष, गोपीगीत, सीतास्वयंवर वगैरे ग्रंथ प्रसिद्ध केले. रामदासांचा दासबोध, श्रीधराचे रामविजय, नलाख्यान, पांडवप्रताप, रुक्मिणीस्वयंवर, शिवलीलामृत वगैरे लोकप्रिय ग्रंथ, त्याचप्रमाणें महिपतीचीं साधुसंताची चरित्रें व उद्धवाचिद्घन, प्रभाकर आणि अमृतराय यांचे लहान ग्रंथ हीं सर्व पुस्तकें याच सुमारास बाहेर पडलीं. परशुरामतात्या गोडबोले यांनीं जुन्या मराठी काव्यांतील उतारे संकलित करून व त्यांस प्रत्येक कवीचें थोडेंसें जीवनवृत्त जोडून वाढवलेली आपल्या नवनीताची आवृत्ति काढली व त्यायोगें मराठी वाङ्मयाची त्यांनीं फारच मोठी सेवा केली. त्यांत जुन्या मराठी काव्याचे उत्कृष्ट मासले आले असल्यामुळें नवनीत हें मराठींतील 'गोल्डनट्रेझरी' च होऊन बसलें आहे.

संस्कृत व इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें करून मराठी वाङ्मयाचें ऐश्वर्य वाढविण्याच्या बाबतींत या कालांत फारच मोठी प्रगति झाली. महादेव शास्त्र्यांनीं अपरोक्षानुभूतीचें भाषांतर केलें. कोल्हापूरच्या महाराजांस ज्ञानदान करण्यासाठीं ह्मणून रघुनाथशास्त्री पर्वते यांनीं गीतेवर एक टीका लिहिली. कृष्णशास्त्री राजवाडे यांनीं मालतीमाधवाचें भाषान्तर केलें. तर प्रसन्नराघव आणि रत्नावलि यांस मराठी रूपांतर देण्याचें श्रेय इतर शास्त्र्यांनीं घेतलें. परशुराम तात्यांनीं शाकुंतल, मृच्छकटिक, वेणीसंहार आणि उत्तररामचरित्र यांची जोड मराठीस करून दिली; व कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या सुंदर साक्यांनीं मराठी वाचकांस मेघदूताचा रसास्वाद कळूं लागला. माधवनिदान, त्र्यंबकी, व वैद्यजीवन यांच्या भाषांतरद्वारा कृष्णशास्त्री भाटवडेकरांनीं आर्यवैद्यक मराठींत आणिलें. रघुनाथ शास्त्री दाते यांनीं मिताक्षराचें भाषांतर करून महाराष्ट्रीयांस आर्यांच्या कायद्याचें ज्ञान करून दिलें कृष्णशास्त्री भाटवडेकरांनीं ब्युटीज ऑफ

हेवन् ( आकाश सौंदर्य ) व कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं ‘ अेराबियन नैटस् ’ ( आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ) या इंग्रजी ग्रंथांची मराठींत भाषांतरें केलीं. कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं चेंबरची ‘ अॅस्ट्रॉनमी ’ ( ज्योतिषशास्त्र ) व नरसिंहशास्त्री ओक आणि विष्णुशास्त्री पंडीत यांनीं ‘ मरेज हिस्ट्री ऑफ इंडिया ’ ( मरेकृत हिंदुस्थानचा इतिहास ) या ग्रंथांचीं भाषांतरें केलीं. वर सांगितलेल्या तीन प्रकारच्या पुस्तकांनीं जशी मराठी भाषेची वाढ होत होती तशीच नांवाजण्यासारखे दुसरे स्वतंत्र ग्रंथ होऊनही ती होत होती.

इंदूरचे प्रसिद्ध सावकार श्रीमंत दाजीसाहेब किबे यांनीं केलेलें आपल्या दाक्षिणेंतील प्रवासाचें वर्णन हें प्रवास या सदराखालीं झालेलें पुस्तक होय.रा.विनायक कोंडदेव ओक यांचें मुलांकरितां केलेलें पहिलें नीतिपुस्तक, गोविंद नारायण यांचें अमितपान, सत्य व स्वच्छता या विषयांवर लिहिलेले निबंध, व झाडें आणि आगगाड्या यांचीं वर्णनें व मुंबई शहराचा इतिहास वगैरे सामान्य गद्य या नांवाखालीं मोडणारीं पुस्तकें तयार झालीं. रे. बाबा पदमनूजींनीं आपली ‘ निबंधमाला ’ व ‘ यमुनापर्यटण ’ हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. या वेळीं सामाजिक व धार्मिक अशा वादग्रस्त विषयांवरही पुस्तकें तयार होऊं लागली होतीं. विष्णु परशुराम रानडे यांचें पुनर्विवाहावरील छोटेखानी पुस्तक, ‘ परमहंसमत ’ ‘ ब्राह्मणधर्माची उत्पत्ति ’ व विष्णुबावा ब्रह्मचारी यांचा ‘ वेदोक्तधर्मप्रकाश ’ वगैरे पुस्तकें हीं या गोष्टींचीं उदाहरणें होत. डॉ. नारायण दाजी यांचें ‘ रसायनशास्त्र ’ व ‘ वैद्यक ’ यावरील ग्रंथ, प्रो. दाजी निलकंठ नगरकर यांचें ‘ शंकुच्छेद ’ ( Conic sections ) डॉ. भिकाजी अमृत यांचें ‘ शारिरशास्त्र ’ ( Anatomy ) व प्रो. केरोपंत छत्रे यांनीं तयार केलेलीं ‘ ग्रहसाधनाचीं कोष्टकें, ’ वगैरे नांव घेण्यासारखीं पुस्तकें शास्त्रीय विषयांत झालीं. कृष्णशास्त्री भाटवडेकर यांचें ‘ विद्युत् ’, हरिचंद चिंतामण यांचें ‘ प्रकाशलेखन ’ ( Photography ) महादेवशास्त्री पुराणिकांचे भूवर्णन ( Physical Geography ). गोविंद गंगाधर फडके यांचें ‘ यंत्रशास्त्र ’ वगैरें बरींच किरकोळ पुस्तकें निघालीं. त्यांत कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें ‘ अनेकविद्यामूलतत्त्व ’ हें पुस्तक बरेंच मोठें आहे.

कादंबरी या सदराखालीं कै. रा. ब. मोरोबा कान्होबा यांची ‘ घाशीराम कोतवाल ’, लक्ष्मणशास्त्री हळवे यांची ‘ मुक्तामाला ’ व बाबा गोखले यांची

'राजा मदन' ह्या तीन नामांकित कादंबऱ्या झाल्या. 'विक्रमबत्तिशी' 'वेताळपंचविशी' 'शुकबहात्तरी' आणि 'बकासुर बखर' वगैरे याच सदराखालीं मोडणारी गोष्टींचीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं.

खंडेराव फडक्यांची 'शिपायांच्या बंडाची हकीकत' व 'इंग्लंदचा इतिहास', हरिकेशवजींचा 'इंग्रज लोकांचा इतिहास' 'कोल्हापूरचा संक्षिप्त इतिहास' 'इजिप्तचा इतिहास' 'रशियायाच्या काथेराइनच्या राज्याचा इतिहास' वगैरे इतिहासाचीं पुस्तकें छापलीं गेलीं.

जनार्दन रामचंद्र यांचीं 'हिंदुस्थानांतील कवींचीं चरित्रें,' विष्णु मोरेश्वर भिडे यांचें 'सायरसचें चरित्र' विष्णुशास्त्री यांचें 'नानाफडणविसाचें चरित्र' आणि भास्कर हरि भागवत यांचें 'राजा राममोहनराय' यांचें चरित्र वगैरे चरित्रात्मक ग्रंथ निर्माण झाले.

१८६४ च्या पुढल्या तीस वर्षांच्या मराठी वाङ्मयाच्या पर्यालोचनाची जी ही प्रस्तावना दिली आहे ती संपविण्यापूर्वी १८१८ ते १८६४ या काळाच्या दरम्यान–ह्मणजे ज्या कांळांतील पुस्तकांचा हा कॅटलॉग केला आहे त्या सर्व काळांत-मराठी वाङ्मयाची एकंदर स्थिति कशी होती याचें थोडेंसें विवेचन करणें अवश्य आहे. १८६४ च्या अखेरपर्यंत छापलेल्या केवळ मराठी ग्रंथांची संख्या ६६१ होती. यापैकीं गद्य ग्रंथ ४३१ व पद्य २३० होते. शालोपयोगी गद्य पुस्तकें ९८ असून त्यांत वाचन पुस्तकें, अंकगणितें, इतिहास, भूगोल, व व्याकरण वगैरे पुस्तकें आलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं भाषांतररूप असल्यामुळें व कांहीं सरकारी हुकुमान्वयें तयार केलीं गेलीं असल्याळें त्यांत उद्दिष्ट हेतूच्या पलीकडे ह्मणण्यासारखें दुसरें कांहीं नाहीं. ह्मणून त्यांचा येथें फक्त नामनिर्देश केला ह्मणजे बस्स आहे. परंतु कर्नल जर्व्हिस, मेजरक्यांडी, सदाशिव काशिनाथ छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, आणि भास्कर दामोदर यांनीं शालोपयोगी प्राथमिक पुस्तकें तयार करून फारच मोठी कामगिरी केली असें ह्मटल्यवांचून रहावत नाहीं.

शालोपयोगी पुस्तकें वजा जातां सुमारें ३२५ गद्य ग्रंथ प्रसिद्ध झाले होते. गद्य वाङ्मयाचा निरनिराळ्या सदरवारीनें विचार करितां जरी या पहिल्या काळांत इतिहासाची लहान मोठीं २३ पुस्तकें आढळतात–व या २३ त ही

जरी १४ हिंदुस्थानसंबंधीं व ६ इंग्लंदसंबंधीं आहेत—तरी वर सांगितल्याप्रमाणें वाङ्मयदृष्ट्या महत्वाचीं अशीं भाषांतरेंच होत. आपल्या वाङ्मयाचा एक विशिष्ट भाग ज्या अनेक बखरी त्या प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न या काळांत कोणींच केलेला दिसत नाहीं. त्याचप्रमाणें ग्रीस व रोम या देशांच्या इतिहासाची व यूरोप आणि अमेरिका यांच्या अर्वाचीन इतिहासाची ओळख मराठी वाचकांस करून देण्याचीही खटपट कोणी केलेली दिसत नाहीं.

कल्पित कथासंबंधानें विचार करितां ‘ आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ’ झाल्यामुळें जुन्या गोष्टींच्या संग्रहांत भर पडली. परंतु अलीकडे ज्यास आपण कादंबरी ह्मणतों तशा कादंबऱ्या लिहिण्याची नुकतीच थोडीशी सुरवात त्या काळांत होत होती. गद्य वाङ्मयाच्या या शाखेंत इतकें दैन्य असण्याचें कारण अगदीं उघडच आहे; तें हें कीं पुरातन इतिहास पुराणांत अशा कथांचा संग्रह विपुल असल्यामुळें त्या बाबतींत लोकांची जिज्ञासा तृप्त होई. व ह्मणून त्यांना अर्वाचीन कल्पित कथांची उणीवच भासत नसे. प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांत इतिहास व गोष्टी या ग्रंथांप्रमाणेंच चरित्रांची संख्या फारच थोडी असून ती असावी त्यापेक्षां कमी आहे. जीं थोड्याबहुत योग्यतेची आहेत अशीं फारच थोडीं पुस्तकें या प्रथम काळांत छापलीं गेलीं. प्रवासवर्णनांची तर याहूनही अल्पता दिसून येते. आमच्या लोकांत धाडशीपणाचें पाणी विशेषसें वसत नसल्यामुळें छापल्या जाणाऱ्या आमच्या गद्य ग्रंथांत या विषयास नेहमीं पुष्कळसें गौणत्वच मिळणार. या कालांत तत्त्वज्ञानावर पुष्कळ ग्रथ झाले असून त्यांची एकंदर संख्या पंचावन आहे. ह्या तत्त्वज्ञानाचा साधारण रोख वेदान्ताकडे असून त्याची मांडणी भगवद्गीतेवर केलेली आहे. केवळ धर्मावर तर असंख्य पुस्तकें झालीं आहेत; परंतु त्यांत भोळसटपणाच्या आचारविचारांचा अतिरेक झाला आहे. पूर्वीची अंधपरंपरा सोडून देऊन योग्य मार्गाचें ज्यांत अवलंबन केलें आहे असा विष्णुबोवा ब्रह्मचारी यांचा वेदोक्तधर्मप्रकाश हा एकच ग्रंथ होय. त्यावेळीं त्या ग्रंथाकडे बऱ्याच लोकांचें चित्त वेधलें.

वरील काळांत इंडियन कमिशनचें दोषाविष्करण व बॉंबे असोशियनचे अहवाल हीं पुस्तकें जर जमेस न धरलीं तर राजकीय ग्रंथांचा पूर्ण अभावच होता असें ह्मणावें लागतें. शास्त्रीय विषयांवर एकंदर ७३ ग्रंथ झाले

परंतु त्यांत ज्योतिषशास्त्र, गणिताचीं मूलतत्त्वें व उच्चप्रतीचें गणित, भूगोल ( Political Geography ), भूवर्णन ( Physical Geography ), महत्वमापन, प्राणी व वनस्पति यांचीं सामान्य वर्णनें वगैरे विषयांवरील शालोपयोगी पुस्तकांचाच पुष्कळसा भरणा होता. सृष्टिशास्त्र ( Natural philosophy ), रसायनशास्त्र, आगगाड्या, विद्यूत् , प्रकाशलेखन वगैरे बाकी राहिलेली पुस्तकें होत. खास शास्त्रीय विषयांत पाहिलें तर या काळांत विद्वानांचें लक्ष मुख्यतः वैद्यकाकडेच लागलेलें दिसतें. कोशांच्या बाबतींत मेजर क्यांडी व क्यापटन मोलस्वर्थ आणि त्यांच्या हाताखालील शास्त्री मंडळी यांनीं केलेल्या फार महत्वाच्या कामगिरीचा उल्लेख पूर्वीं आलाच आहे. इकडील पंडितांत या बाबतींत रेव्ह. बाबा पदमनजी, श्रीकृष्णशास्त्री तळेकर, व रघुनाथशास्त्री गोडबोले वगैरे मंडळीचा नाम निर्देश करणें अगदीं अवश्य आहे. जरी कायदा या विषयावर ४१ पुस्तकें झालीं तरी मयूख व मिताक्षरा या दोन ग्रंथांचीं सरकारांनीं तयार करविलेली भाषांतरेंच काय तीं नांव घेण्यासारखीं आहेत. बाकीची पुस्तकें खटल्यांच्या निकालांनीं व कायदेकानूंच्या भाषांतरांनींच भरलेलीं आहेत.

कवितांसंबंधीं सविस्तर लिहिण्याची जरूर नाहीं कारण संस्कृत ग्रंथांच्या भाषांतरांशिवाय व रूपांतरांशिवाय या काळांत या दिशेनें विशेष नांवाजण्यासारखे पयत्न झालेले दिसत नाहींत. बाकीचे काव्यग्रंथ ह्मणजे जुन्या मराठीं कवींच्या छापलेल्या कवितेचे होत. मोरोपंताखेरीज इतर कवींचे समग्र ग्रंथ छापणें, त्यांची जीवन चरित्रें लिहिणें व त्यांच्या कृतीचें विवेचन करणें या गोष्टीकडे पहिल्या काळांत कोणीच लक्ष पुरविलेलें दिसत नाहीं. पहिल्या ५० वर्षांत ( १८१८ ते १८६४ ) झालेल्या प्रयत्नांचें जें हें गुणदोषविवेचन केलें आहे तें प्रत्यक्ष फलप्राप्तीच्या दृष्टीनें फारसें समाधानकारक नाहीं खरें, परंतु आमच्या राष्ट्रांत नेटिव एज्युकेशन सोसायटी १८२९ त स्थापन होऊन ग्रंथप्रकाशनद्वारा लोकांची विद्येविषयीं आस्था प्रथमतःच निदर्शनास येऊन ५० वर्षेंच झालीं आणि राष्ट्राच्या आयुष्याचा विचार केला असतां ५० वर्षें ह्मणजे एका घटके सारखीं आहेत ही गोष्ट विसरतां कामा नये. प्रत्येक दशकांत ग्रंथसंख्या ३ ते १०, १० ते ३०; ३० ते १००; १०० ते ५५० प्रमाणें ह्मणजे जवळ जवळ भूमितिश्रेढीच्या प्रमाणानें वाढत गेली, हें मोठें आशाजनक

सुचिन्ह होय. ज्या ज्या निरनिराळ्या मार्गांनीं महाराष्ट्र वाङ्मयाचा अभ्युदय व्हावयाचा होता ते सर्व मार्ग आतां खुले झाले होते, जुनी कविता छापण्याच्या कामांत बरीच प्रगति झाली, आणि जुन्या ग्रंथभांडारांत नवीन भर टाकण्याचाही उपक्रम सुरू झाला. फलनिष्पत्तीच्या मानानें भूतकाल जरी रिता गेला होता तरी प्रगतीचें पाऊल इतकें पुढें पडलें होतें कीं भावी कालांत फलाशा पुर्णपणें तृप्त होईल असें खात्रीपूर्वक वाटत होतें, तरी पूढील तीस वर्षांतल्या ग्रंथकारांनीं व भाषांतरकारांनीं आपल्या परिश्रमाच्या योगानें ही आशा कितपत फलद्रूप करून दाखविली याचा या टिपणाच्या दुसऱ्या भागांत क्रमशः विचार केला आहे.

---

### भाग २ रा.

## जुनें गद्यपद्य वाङ्मय.

सन १८६७ च्या सुमारास ‘ रजिस्ट्रार आफ नेटिव्ह पब्लिकेशन्स ’ ( देशी ग्रंथ नोंदणारे कामगार ) ही जागा अस्तित्वांत आली. या जागेवरील अधिकाऱ्यांनीं प्रतिवर्षीं आपल्या अहवालांत सरकारास जी सविस्तर माहिती दिली आहे तिचें साहाय्य आपणांस मराठी भाषेच्या पुढील अभिवृद्धीचा विचार करितांना होतें. सुमारें सन १८६४ ते १८९४ या दरम्यानचा तीस वर्षांचा काळ ह्मणजे युनिव्हर्सिटीपरीक्षापद्धतीच्या पूर्णवाढीचा काळ होय. या काळांत आर्टस् परिक्षांच्या अभ्यासक्रमांतून दुसरी भाषा या नात्यानें देशी भाषांचें उच्चाटन होऊन त्यांची जागा हिंदुस्थानांतील पुरातन व अभियुक्त भाषांनीं ( Classical Lauguages ) पटकाविली, व त्या भाषांस उत्तेजन मिळूं लागलें. देशी भाषांबद्दल संस्कृतादि अभियुक्त भाषा घालण्याचा ठराव युनिव्हर्सिटीनें दिसेंबर सन १८६३ सालीं केला व त्याची अंमलबजावणी १८६७ सालापासून होऊं लागली.

त्या वेळचे युनिव्हर्सिटीचे व्हाईस चॅन्सेलर सर अलेक्झांडर ग्रांट व विद्याधिकारी हावर्डसाहेब यांनीं असें प्रतिपादन केलें कीं सांप्रत या इलाख्यांतील देशी भाषांत गद्यवाङ्मय मुळींच नाहीं व पद्यवाङ्मय म्हणजे संस्कृतादि अभियुक्त भाषांची केवळ छायाच होय. तेव्हां या संस्कृतादि भाषांचे नीट अध्ययन झाल्यास देशी भाषांतील वाङ्मयाच्या सर्व शाखांच्या अभिवृद्धीस

फारच मदत होईल; आणि केवळ याच मुद्यावर आह्मीं वरील फेरफारांची तरफदारी करीत आहों. दुसऱ्या पक्षीं डॉ. विल्सन्, डॉ. मरेमिचेल, रावसाहेब मंडलीक आणि सर रेमंडवेस्ट, यांनीं निरनिराळीं कारणें दाखवून या फेरफारांबद्दल आपली प्रतिकूलता दर्शविली. देशी भाषांच्या पुरस्कर्त्यांनीं असें प्रतिपादन केलें कीं मराठी व गुजराथी या दोन्ही भाषांत वाङ्मय आहे, त्यांत कांहीं भाषाविषयक विशिष्ट धर्मही आहेत, त्या विशिष्ट धर्मांचें लक्ष्यपूर्वक अध्ययन होणें योग्य आहे, अशा अध्ययनाच्या अभावीं त्यांच्या अभिवृद्धीकडे दुर्लक्ष्य होईल, व दोन अभियुक्त भाषांत प्राविण्य मिळवावयाचें ओझें विद्यार्थ्यांच्या शिरावर लादल्यास शास्त्रीय विषयांकडे लक्ष देण्यास त्यांस मूळींच फुरसद मिळणार नाहीं. संस्कृतादि अभियुक्त भाषांच्या व देशी भाषांच्या वकिलांनीं प्रदर्शित केलेली आशा किंवा भीति पूढें घडून आलेल्या गोष्टींवरून कितपत खरी ठरते याचा निर्णय मधील तीस वर्षांच्या ( १८६४—१८९४ ) अनुभवावरून सहज करितां येईल.

सन १८६८ च्या पूर्वींचे अहवाल उपलब्ध नाहींत, तथापि त्यापूर्वी तीन वर्षें पसिद्ध झालेल्या पुस्तकांची यादी स्वतंत्र छापलेली आहे. ह्या अहवालांत व क्यार्टलागांत १८६५ ते १८९७ पर्यंतच्या ३२ वर्षांत प्रसिद्ध झालेल्या मराठी पुस्तकांचें आंकडे, खालीं दिल्याप्रमाणें आहेत. अशा तऱ्हेच्या आंकड्यावर सर्वच भिस्त ठेवणें जरी इष्ट नाहीं तरी त्यांपासून पुष्कळ गोष्टी व्यक्त होतात हें निःसंशय आहे.

| वर्षें | छापलेल्या मराठी पुस्तकाची संख्या. | प्रत्येक वर्षांची सरासरी. |
|---|---|---|
| १८६५ ते १८७४ | .........१, ५३० | १५३ |
| १८७५ ते १८८४ | .........३, १४३ | ३१४ |
| १८८५ ते १८९६ | .........३, ८२४ | ३२० |
| | एकूण ८, ४९७ | |

वर सांगितलेल्या ३२ वर्षांत एकुण ८४९७ पुस्तकें छापलीं गेली असें या आंकड्यावरू दिसतें. पूर्वींच्या ५० वर्षांत पसिद्ध झालेलीं ६६१ पुस्तकें यांत मिळविलीं तर एकंदर संख्या ९,१५८ होते. ठोकळ आकड्यांत सांगावयाचें ह्मणजे १८१८ ते १८९६ पर्यंत एकंदर ९००० मराठी पुस्तकें छापलीं गेलीं.

वरील आंकड्यांत मासिकें, चोपडीं ( Pamphlets ) व किरकोळ ग्रंथ जरी जमेस धरलेले नाहींत, तथापि त्यांत १२०० पुस्तकांच्या द्वितीयावृत्त्या आल्या आहेत. तेव्हां ह्या वजा जातां बाकी ७८०० ग्रंथ रहातात. किंचित् बारकाईनें पाहिलें असतां ( १ ) स्वतंत्र ग्रंथ ( २ ) मराठी ग्रंथांचा जीर्णोद्धार व ( ३ ) भाषांतरें या विषयांतील प्रमाण खालीं दिल्याप्रमाणें आहे असें आढळून येईल.

| | स्वतंत्र. | जीर्णोद्धार. | भाषांतरें. | एकूण. |
| --- | --- | --- | --- | --- |
| | ४,७६८ | २,१०९ | ९२१ | ७७९८ |
| शेंकडाप्रमाणः | ६२ | २७ | ११ | |

ठोकळ मानानें पाहातां चोपडीं व मासिकें याशिवाय जवळ जवळ ५००० स्वतंत्र ग्रंथ होतात, आणि जिर्णोद्धार व भाषांतरें मिळून बाकीचे ३००० होतात. अलीकडील रिपोर्टांत ग्रंथाचें प्रमाण उत्तरोत्तर वाढत आहे व जिर्णोद्धार व भाषांतरांचें प्रमाण हळूहळू कमी होत आहे ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. १८५७–१८६४ या सालांत आमच्या ग्रंथकारांच्या व भाषांतरकारांच्या ग्रंथांची सरासरी प्रतिवर्षी ६० पडते. १८६५ ते १८८५ मध्यें ती द्विगुणित झाली; व पुढल्या २० वर्षांत तर तिचें मान पांचपटीवरही गेलें. सन १८६५ ते १८९७ च्या ३२ वर्षांच्या सरकारी रिपोर्टांत वरील एकंदर पुस्तकांचें १५ विभाग केले आहेत, त्यांत १४ गद्य ग्रंथाचे असून कवितेचा एकच विभाग आहे. वरील काळांत कवितेच्या सदरांत १५०० गद्य ग्रंथ पडले. परंतु तितक्याच अवधींत गद्याच्या सर्वसदरांत त्याच्या चौपट पडले. या पाहिल्या ५० वर्षांत गद्य व पद्य यांतील प्रमाण ४ : २ असें होतें तें नंतरच्या ३० वर्षांत ४ : १ पर्यंत चढलें. ही जी वाढ झाली ती समाधानकारक व हितकारकही आहे हें स्पष्ट आहे. गद्यपद्य ग्रंथांच्या प्रकाशनांत एक विशिष्ट प्रकारचा फरक दिसून येतो तो हा कीं पहिल्या ५० वर्षांत पद्याचें गद्याशीं जें प्रमाण होतें त्यापेक्षां नंतरच्या ३० वर्षांतील प्रमाण पुष्कळच कमी झालें एवढेंच नाहीं तर स्वतंत्र भाषांतररूप काव्यग्रंथाचें शेंकडा प्रमाण जुन्या मराठी काव्य प्रकाशनाच्या प्रमाणापेक्षां फारच वाढलें. बावीस वर्षांची ( १८६५ ते १८७३

व १८८४ ते १८९६ ) जी सविस्तर हकीकत उपलब्ध आहे तीवरून असें दिसून येतें कीं प्रसिद्ध झालेल्या ९५० पद्यग्रंथापैकीं ५६० ग्रंथ ह्मणजे शेंकडा सुमारें ६० हून अधिक जुन्या पुस्तकांच्या नव्या आवृत्तीच होते व स्वतंत्र ग्रंथ आणि भाषांतरें फक्त शेंकडा ४० च होतीं. एकंदर प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांशीं पुनरावृत्त ग्रंथांचें ठोकळ प्रमाण वर सांगितल्याप्रमाणें एक चतुर्थांश होतें. सर्व पद्यग्रंथांत तीन चतुर्थांश ग्रंथ जुन्या कवितांचे आहेत. या गोष्टीवरून जुन्या मराठी काव्यांचे आह्मीं किती ऋणी आहों हें अगदीं स्पष्टपणें दिसून येईल. ह्यावरून आणखी दुसरी एक गोष्ट व्यक्त होते ती ही कीं वर सांगितलेल्या ३२ वर्षांत जुन्या कवितेच्या जीर्णोद्धाराची बरीच कामगिरी झाली; आणि अर्वाचीन ग्रंथकारांनीं सामान्यतः गद्यवाङ्मयाबद्दल जें प्रेम दाखविलें तसें त्यांनीं जुन्या कवितेबद्दल दाखविलें नाहीं.

एकंदर झालेल्या कामगिरीचा आढावा पाहिला तर, तुकाराम, मोरोपंत, ज्ञानेश्वर, रामदास, वामन, मुक्तेश्वर, एकनाथ, श्रीधर आणि महिपति यांचे समग्र ग्रंथ निरनिराळ्या प्रकाशकांनीं छापून काढून १८५७ ते १८६४ च्या दरम्यान सुरू झालेलें काम शेवटास नेलें. मोरोपंत, वामनपंडित, ज्ञानेश्वर, रामदास, यांचे लहान मोठे ग्रंथ सटीक छापण्याचें काम व मुकुंदराज, अमृतराय, रामजोशी, रघुनाथ पंडित, आनंदतनय, निरंजन, कृष्णकवि, नरहरि, रंगनाथस्वामी, निळोबा, शिवदिनकेसरी, चिंतामणी, मध्वमुनी, सोयरोबा, केशवस्वामी, प्रभाकर, अनंतफंदी आणि पोवाडे व लावण्या करणारे इतर कवि यांचे ग्रंथ प्रकाशित करण्याचें काम फारच जारीनें सुरू झालें. मुकुंदराज व ज्ञानेश्वरांपासून तों चालू शतकापर्यंत प्रसिद्ध अशा जुन्या मराठी कवींची संख्या जवळ जवळ ४० पर्यंत येते. यांपैकीं कांहीं प्रमुख कवींचीं नांवें दिल्यास उपयोग होईल, असें वाटल्यावरून त्यांतील विशेष प्रमुख होते त्यांचीं नांवें खालीं दिलीं आहेत. मुकुंदराज, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, अमृतराय, रामदास, तुकाराम, महिपति, वामनपंडित, श्रीधर, रामजोशी, आनंदतनय, भैरवनाथ, शिवदास, रंगनाथस्वामी, प्रभाकर, अनंतफंदी, होनाजी, सगनभाऊ, परशराम, जनाबाई, मिराबाई आणि वेणूबाई. हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही भाषेंत कवींची इतकी नामांकित नामावळी सांपडावयाची नाहीं. मराठी कविता संस्कृताची छाया आहे असें म्हणून अशा रत्नभांडाराची किंमत कमी करणें ह्मणजे मराठी वाङ्मयाच्या या शाखेच्या अत्यंत विशिष्ट

लक्षणासंबंधीं अज्ञान प्रदर्शित करणें होय. वर दिलेल्या नामावलींतून फक्त सहा कवींनीं मात्र संस्कृतांतील पौराणिक व ऐतिहासिक वाङ्मयांतून स्फूर्ति मिळविण्याचा उद्योग केलेला दिसतो. एकप्रकारें इतर कवींचा जुन्या प्रवृत्तीविरुद्ध एकसारखा निषेध चालू होता. पुष्कळ कवि व संत संस्कृतज्ञ नव्हते व जुन्या ध्येयांबद्दल आपला अनादर व्यक्त करण्यांत त्यांनीं बिलकूल भीड धरली नाहीं. त्यांची कविता पंडितांसाठीं नसून सामान्य जनसमूहासाठीं होती; व नांवाजलेल्या ब्राह्मणपंडित कवींपेक्षां त्यांच्यांतील पुष्कळजणांत खरें कवित्वही अधिक दिसून येतें. नामदेव, तुकाराम, एकनाथ, रामदास, महिपती, मुकुंदराज, मिराबाई, जनाबाई, रामजोशी, निळोबा, प्रभाकर, रंगनाथस्वामी, वगैरे कवींचे ग्रंथ नुसते चाळले तरी वरील ह्मणण्याची सत्यता पटेल. त्यांस खास अर्वाचीन कवीच ह्मटलें पाहिजे. अर्वाचीन हिंदुस्थानाच्या उषःकालापासून तों मराठी राज्याच्या उदयकालापर्यंतच्या प्रगतीच्या तीन शतकांत जें नवीन मत जोरानें प्रचलित होत चाललें होतें त्या मताचे निदर्शक ते कवि होते. पोवाडे व लावण्या करणारांच्या काव्यास संस्कृताचा खात्रीनें गंधही नव्हता इंग्रजांनीं दक्षिणाहिंदुस्थान काबीज केल्यापासून, या जुन्या कवींच्या पंक्तीस बसवितां येईल, असा एकही नामांकित कवि मराठी वाङ्मयाच्या या शाखेंत निपजला नाहीं. कांहींही असो आमचा स्वातंत्र्यसूर्य मावळल्याबरोबर आमच्यांतील कवित्वज्योतीही विझाली. मधून मधून जो एकाददुसरा दिवा क्वचित् झळकतो त्याचें तेज स्वयंभू नसून बहुतेक उसनेंच दिसतें. अमच्या पंडिताच्या पहिल्या पिढींत एक कृष्णशास्त्री चिपळूणकर नांव घेण्यासारखे झाले खरे, परंतु त्यांनींही स्वतंत्र काव्यरचनेचा फारसा प्रयत्न केलेला आढळत नाहीं. ते व परशुरामपंत गोडबोले हे उत्तम भाषांतरकार होऊन गेले. संस्कृत कवितेस प्रचलित मराठीचा वेष देऊन तिला नटविण्याची हातोटी त्यांस उत्तम साधली होती. कृष्णशास्त्री राजवाडे व गणेशशास्त्री लेले हे त्याच वर्गांतील होत. तरी रघुवंशाच्या भाषांतरावरून लेल्यांची आधिक श्रेष्ठता दिसून येते. सांप्रत कवींच्या ग्रंथातही उत्तम कावितेचे मासले आढळतात. डॉ. के. आर. कीर्तिकर यांचें–'प्रिन्सेस'चें रूपांतर–इंदिरा, रा. कुंटे यांचा 'राजा शिवाजी' व 'मन' (Sketh of mind), रा. सांगले यांचें 'ख्रिस्तस्तोत्र' (Christian hymn) भास्कर दामोदर यांची 'रत्नमाला' जुवेकरांची 'कृष्णाकुमारी' वामन दाजी ओक यांचें 'काव्यमाधुर्य' बजाबा प्रधानाचें 'दैवसेनि' (Daiva

Seni ), चिंतामणी पेठकर यांचें 'गंगावर्णन' वि. मो. महाजनींची ' कुसुमांजली ' रा. पु. बा. जोशी यांची ' पद्यसुधा, ' वासुदेव शास्त्री खरे यांचें ' यशवंत महाकाव्य, ' वगैरे उत्तम मराठी काव्यांची उदाहरणें होत. शंकर मोरो रानडे, वि. को. ओक, गोविंद वासुदेव कानिटकर, रिसबूड, मोगरे, लोंढे, नित्सुरे, लेंभे, भांडारे, दामले, वगैरे मंडळींचे लहानसहान प्रयत्न त्यांच्या कवित्वशक्तीचे चांगले द्योतक आहेत खरे परंतु यांपैकीं एकानेंही एकादा मोठा ग्रंथ करण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. हें ह्मणणें इतर सर्व मराठी कवींसही लागू पडतें. आवेश, सहजस्फूर्ति, तीक्ष्ण व सूक्ष्म नैतिक दृष्टि इ. गुणांनीं ज्याचें ग्रंथांत जणूं काय जादूच भरलेली आहे असे तुकारामाचे गुण; उपदेशपरता व चातुर्य हे रामदासाच्या कवितेचे विशिष्ट गुण; श्रीधर व मुक्तेश्वर यांचीं वाचकांचीं मनें उचंबळून टाकणारीं वर्णनें, किंचित् विलक्षण पण व्यंग्यार्थपूर्ण असे ज्ञानेश्वराचे दृष्टान्त, अमृतरायाचा माधुर्यप्रवाह, मनास पाझर फोडण्याचा वामनपंडिताचा प्रधानगुण, मोरोपंताची भाषाशुद्धि, शब्दप्रभुत्व आणि उदात्त हेतु, नामदेव मिराबाई यांची भक्ति, एकनाथाचे स्फूर्तिदायक विचार, रामजोशाचें रोखठोक सत्यप्रतिपादन, रघुनाथपंडिताची आश्चर्यजनक, सुंदर व अलंकारयुक्त भाषाशैली वगैरे गुणांचा केवळ अस्फुट प्रतिध्वनिच अर्वाचीन काव्यांत प्रतीतीस येतो आणि कांहीं आधुनिक कवींनीं तर विषयांची निवड व त्यांची मांडणी उत्तम इंग्लीश कवींच्याच धर्तीवर केलेली आहे.

येथवर मराठींतल्या जुन्या व नव्या काव्याचें विवेचन झालें. या समग्र वाङ्मयाचा विचार करितां तें विस्तीर्ण व अनेकविध असून आस्थेनें अध्ययन करण्याच्या लायकीचें आहे. हल्लीं कवित्वशक्तीचा दिसून येणारा ऱ्हास निरनिराळ्या कारणांनीं झाला असेल; परंतु त्यांतील एक कारण असें दिसतें कीं बुद्धिमान माणसांस आपली बुद्धि दोन अभियुक्त ( Classics ) भाषांच्या अध्ययनाकडे वळविणें भाग पडल्यामुळें तिच्या स्वाभाविक विकासास खळ पडतो. कारण वरील दोन भाषांच्या अध्ययनांतच त्यांचे बहुतेक पूर्ववय निघून जातें; आणि अशा स्थितींत त्यांना आपल्या राष्ट्रीय भाषेच्या ऐश्वर्याची चुकूनही ओळख होत नाहीं; ह्मणून आमच्या होतकरू मंडळीनें उत्तम इंग्रजी व संस्कृत काव्याच्या अध्ययनाबरोबर जुन्या देशी काव्याचा जर अभ्यास

केला नाहीं तर आमच्या वाङ्मयाच्या या शाखेंत अधिक प्रगति होणें अगदीं अशक्य आहे ही गोष्ट आतां अगदीं उघड आहे. एकाद्या कोमल रोप्यावर कलम करावयाचें असल्यास तें मातृभूमींत उगवून त्याचीं पाळेमुळें त्या जमी-नींत चांगलीं खोल गेलीं पाहिजेत नाहीं तर त्यावर केलेलें विदेशी कलम कधींही जोर धरून फोंफावणार नाहीं. मूळच्या झाडास पाणी घालून त्याची मातृभूमींतच जेव्हां नीट जोपासना करावी तेव्हां त्यास घातलेलें विदेशी खत लागू पडतें, आणि मग त्याच्यायोगानें फलाचा स्वाद व सौंदर्य अधिक वाढ-ण्याचा संभव असतो. कवि जन्मावेच लागतात. हुकमाबरोबर ते तयार होत नाहींत. कवित्वाचा स्वाभाविक विकासच व्हावा लागतो तेथें हस्तलाघवाचें काम नाहीं. आपल्याच वंशांतील महान् महान् कवींच्या स्फूर्तिदायक काव्यांचें बालपणापासून अध्ययन करून मोठमोठ्या बुद्धिमान पुरुषांच्या मनांत कवि-त्वाची ज्योत पुन्हा प्रज्वालित झाल्याशिवाय अर्वाचीन मराठी काव्याचा विकास होऊन त्यास उज्वल स्वरूप येण्याची आशा करण्यास मुळींच आधार नाहीं हें खास आहे.

जुन्या कवितेसंबंधीं व अर्वाचीन कवितेवरील तिच्या श्रेष्ठत्वाविषयीं जें वर सांगितलें तेंच बहुतेक अंशीं बखरी, कैफियती, व मराठी इतिहासांतील मोठमोठ्या प्रकरणांतील जो पत्रव्यवहार छापून पुन्हा प्रसिद्ध केला आहे त्याजविषयीं लागू पडतें. या अवाढव्य संग्रहापैकीं पहिल्या ५० वर्षांत कांहीं-एक छापून काढण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं. रा. सा. का. ना. साने. व ज. बा. मोडक यांनीं आपल्या राष्ट्राच्या जुन्या इतिहासाबद्दल जो योग्य अभिमान दर्शविला त्याचें पहिलें फळ म्हणजे त्यांनीं सुरू केलेलें 'काव्योतिहास संग्रह' नांवाचें मासिकपुस्तक हें होय. या मासिकांत जुन्या बखरी व प्रसिद्ध न झालेली कविता छापण्याचा त्यांचा उदात्त उद्देश होता. व तें काम त्यांनीं १२ वर्षें पर्यंत मोठ्या शिताफीनें केलें. अशारीतीनें प्रसिद्ध झालेल्या बखरींचे फुटकळ भाग स्वतंत्र ग्रंथरूपानें त्यांनीं छापिले. त्यामुळें हल्लीं जवळ जवळ मराठींत ४० ग्रंथ झाले आहेत या ग्रंथांत मराठ्यांच्या इतिहासांतील चटका लावणाऱ्या अशा काळांतील गोष्टींचें पूर्ण व यथातथ्य वर्णन केलेलें सांपडतें. यापैकीं कांहीं बखरी १६ व्या शतकांत प्रसिद्ध झालेल्या अर्वाचीन युरोपीयन इतिहा-साच्या बखरींच्या तोडीच्या आहेत; व त्यांपैकीं भाऊसाहेबांची बखर व पानि-

पतची बखर या सारख्या थोड्या भाषादृष्टीनेंही फार महत्वाच्या आहेत. आमच्या कांहीं पदवीधरांची उदाहरणें पाहून निरनिराळ्या घराण्यांचा इतिहास लिहिण्याची स्फूर्ति कांहीजणांस झाली. व त्याप्रमाणें—रा. गुप्ते याचें ‘ प्रभुज्ञातींतील प्रमुख पुरुष ’ विंचूरकर, दाभाडे, आंग्रे, यांचे इतिहास व नागपूरकर भोंसले, गायकवाड, शिंदे व होळकर यांच्यातील राजकर्त्या पुरुषांच्या वंशाचे इतिहास वगैरे पुस्तकें प्रसिद्ध झालीं. सारांश पुढें ज्या विषयीं चर्चा केली आहे ते सर्व उत्तम अर्वाचीन इतिहास व चरित्रें या चांगल्या वळणाची साक्ष देत आहेत. आक्वर्थ साहेब व रा. तुकाराम शाळिग्राम यांनीं पोवाडे प्रसिद्ध केल्याचें सर्वांस महशूर आहेच. सिंहगडावरील पोवाड्यासरख्या कांहीं पोवाड्यांवरून तर त्या कवींची प्रतिभा फारच उत्तम दर्जाची असली पाहिजे असें वाटतें. सांप्रत ह्या बखरी व हा पत्रव्यवहार छापण्याचें काम दुसऱ्या मंडळीनें हातीं घेतलें आहे, व त्यांत कोणी पदवीधर नाहींत. मिरजचे वासुदेव शास्त्री खरे; साताऱ्चे रा. पारसनीस, व पुण्याचे रा. आपटे व राजवाडे ही त्यांतील मंडळी होत. दोन मासिकें फक्त या कामालाच वाहिलेलीं आहेत. जुन्या कविते संबंधीं वरतीं जे विचार न्यायमूर्तीनीं प्रगट केले आहेत ते या जुन्या गद्य वाङ्मयाच्या भागांसही बरोबर लागू पडतात.

हिंदुस्थानांत इतिहासज्ञानाचा पूर्ण अभाव आहे असा जो असद्ग्रह आमच्या तरुणांच्या मनांस बालपणापासूनच चिकटतो त्याचा पार नायनाट झाल्याखेरीज व त्यांस या तत्कालीन गोष्टींची व लेखांची खरी योग्यता किती आहे हें शिकविल्याशिवाय त्यांच्यांत खऱ्या ऐतिहासिक दृष्टीची व विवेचक बुद्धीची खरी व कायमची वाढ सुरू होईल अशी आशा करणें अगदीं व्यर्थ आहे, आणि वाङ्मयाच्या या भागांतील भावी सुधारणा व यशःप्राप्ति वरील गोष्टींवरच निःसंशय अवलंबून राहील.

भाग ३ रा.

# भाषातरें व रूपांतरें. ( Adaptations. )

जुनी कविता व गद्य बखरी यांचा येथवर विचार झाला. अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा या पुढील अत्यंत चित्ताकर्षक भाग ह्मणजे संस्कृत व इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें हा होय. १८६५–१८९५ पर्यंतच्या तीस वर्षांत या सदराखालीं एक हजार पुस्तकें तयार झालीं. १८६५–७३ आणि १८८४–१८९६ या २२ वर्षांची जी सविस्तर हकीगत उपलब्ध आहे, ती वरून असें आढळतें कीं, या काळांत जीं एकंदर ७०० पुस्तकें भाषांतररूपानें तयार झालीं, त्यांत – चरित्रें १७, नाटकें ४८, कादंबऱ्या ११३, इतिहास २६; भाषाविषयक १५, कायद्याचीं १२०, वैद्यकीचीं ३०, राजनीतिचीं ८, तत्त्वज्ञानाचीं ४०; धर्म ५२, भौतिक शास्त्र ६२, प्रवास २, कविता ३६, आणि किरकोळ २१०-अशी निरानिराळ्या ग्रंथांची संख्या होती. संस्कृत व इंग्रजी ग्रंथांच्या भाषांतरद्वारा मराठी वाङ्मयांत ही जी भर पडली, तींत त्या त्या भाषांचा अंश आहे किंवा नाहीं व असल्यास त्यास प्राधान्य किती मिळालेलें आहे, ह्या प्रश्नांच्या चौकशींतच कायतें सार आहे. रिपोर्टांत जेवढीं चांगलीं ह्मणून नांवाजलेलीं आहेत, तेवढ्यांचाच विचार केला तर अशीं १६० पुस्तकें संस्कृतांतून व १२० इंग्रजींतून, भाषांतरद्वारा मराठींत आलीं असें दिसतें. संस्कृतांतून झालेल्या भाषांतरांत चरित्र, इतिहास, व राजनीति या विषयांवर ग्रंथ नाहींत हें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. या बाबतींत जी उत्तम भर पडली ती इंग्रजी ग्रंथाच्याच भाषांतरांनीं होय. उलट पक्षीं कविता व धर्म यां विषयांस इंग्रजी भाषांतराची काडीमात्र मदत झाली नसून, तें सर्व क्षेत्र संस्कृत भाषांतरांनीं पूर्णपणें व्यापलेलें आहे. वैद्यक विषयांत इंग्रजी भाषांतराची जास्त भर पडली असावी असें वाटण्याचा संभव आहे खरा, परंतु, या बाबतींत, दोन्ही भाषांकडून मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीस अगदीं सारखीच मदत झालेली आहे. वास्तविक पाहिलें तर मराठींत आयुर्वेद शिकविण्याचे वर्ग सुरू झाले ह्मणूनच या विषयावरील इंग्रजी ग्रंथाचीं भाषांतरें जन्मास आलीं, नाहींतर त्यांस जग दिसलें नसतें. हीं विद्यार्थ्यांकरितां ह्मणून तयार केलेलीं पुस्तकें सर्व सामान्य लोकांसही उपयोगी पडूं

लागलीं. आयुर्वेदविद्यालयाचे जे वर्ग वर सांगितले त्यांत कांहीं वर्षांनीं मराठींतून शिक्षण देण्याचा क्रम बंद पडला ही मोठी दुर्दैवाची गोष्ट झाली, कारण त्याचा परिणाम असा झाला कीं, मराठींत शास्त्रीय विषयांवर मोठमोठे ग्रंथ होण्याचा हा महत्वाचा मार्ग अगदीं बंद पडला, व त्यानंतर या बाबतींत कोठून उत्तेजनही मिळेनासें झालें. जेवढ्या इंग्रजी वैद्यक ग्रथांचीं भाषांतरें झालीं आहेत, त्याच्याहून दुप्पट भाषांतरें संस्कृतांतून आलीं आहेत; यावरून लोकांचा ओढा संस्कृत वैद्यकाकडे किती आस्थापूर्वक आहे हें सहज दिसून येईल.

कायद्याच्या प्रकरणांतही ह्याच गोष्टीची पुनरावृत्ति दिसून येते; आणि ह्मणूनच फारच थोड्या इंग्रजी कायद्यांच्या पुस्तकांचीं भाषांतरें मराठींत झालेलीं आढळतात. कायदेकानू व खटल्यांचे निकाल यांच्या भाषांतराची बरीच गर्दी मराठी कायद्यांच्या पुस्तकांत उडालेली आहे; परंतु, वरील विधान करितांना तीं जमेस धरलेलीं नाहींत. वकीलीची परिक्षा जोपर्यंत देशी भाषांत घेतली जात असे तोंपर्यंत, मराठींत कायद्याचीं पुस्तकें छापण्यास बरेंच प्रोत्साहन मिळे. परंतु त्यांच्या ऐवजीं इंग्रजी आल्यामुळें त्या उत्साहावर पाणी पडलें. यावरून इंग्रजी कायद्यांच्या भाषांतराच्या अल्पतेचें कारण सहज दिसून येईल.

एकंदर भाषांतर या सदरांत नाटकांच्या कामीं जें यश मिळालेलें आहे तसें दुसरें कशांतच मिळालेलें दिसत नाहीं. या कामांत बरींचशी भर संस्कृत व इंग्रजी भाषांतून पडलेली असून ती सारख्याच प्रमाणानें पडलेली आहे. शेक्सूपियर हा सर्वांस अत्यंत प्रिय झालेला दिसतो. त्याचीं २० नाहींत, तरी १८ नाटकें भाषांतरानें अथवा रूपांतरानें मराठींत आलेलीं आहेत. कांहीं नाटकांचीं दोन दोन तीन तीन ग्रंथकारांनीं निरनिराळीं भाषातरें केलेलीं आहेत. या ग्रंथांचीं नांवें जाणण्यास वाचक अगदीं उत्सुक असतील ह्मणून तीं खालीं नमूद केलेली आहेत.

१ हॅम्लेट ( विकारविलसित. ). २ सिंबेलाईन ( तारा ). ३ किंगलिअर ( अतिपीडचरित ). ४ आल्सवेल दट एन्ड्स्वेल ( वल्लभानुनय ). ५ ए वुइंटर्स् टेल ( मोहविलसित ). ६ ए कॉमेडि ऑफ एरर्स ( भ्रांतिकृतचमत्कार ). ७ द टेमिंग ऑफ द श्रू ( त्राटिका ) ८ टू जंट्लमेन ऑफ व्हेरोना ( कांतिपूरचे दोन गृहस्थ ). ९ द मर्चंट् ऑफ व्हेनिस ( मणिपूरचा व्यापारी ). १० ॲज् यू लाइक् इट्. ११ मच् ॲडो अबाउट् नथिंग.

१२ जुलिअस सीझर. १३ अन्टनि अँड क्लिओपाट्रा ( वीरमणी आणि शृंगारसुंदरी ). १४ अथेल्लो ( झुंजारराव ). १५ तिसरा रिचर्ड. १६ टेंम्पेस्ट ( तुफान ). १७ रोमिओ अँड जुलिएट ( प्रतापराव आणि मंजुळा; शशिकला आणि रत्नपाल ). १८ ट्वेल्फ्थ नाईट.

दुसरीं इंग्रजी नाटकांची भाषांतरें ह्मणजे गोल्डस्मिथचीं ( शी स्टुप्स् टु कॉंकर ( विजयजिगीषा, धुंडिराज. स. जोशी. समजुतीचा घोटाळा. बर्वे. ) व ( द गुड् नेचर्डमान्, सुशील गृहस्थ ) हींच कायतीं होत.

संस्कृत नाटकासंबंधानें पाहिलें तर त्यांतील सर्व प्रसिद्ध नाटकांची भाषांतरें झालेलीं आहेत. त्यांपैकीं शाकुंतलासारख्याचें भाषांतर तर निरनिराळ्या चार पांच ग्रंथकारांनीं केलेलें आहे. शाकुंतल, मृच्छकटिक, उत्तररामचरित, विक्रमोर्वशी, मुद्राराक्षस, प्रबोधचंद्रोदय, वेणीसंहार, मालतीमाधव, मालविकाग्निमित्र, रत्नावलि आणि प्रसन्नराघव हीं त्यांतील प्रमुख नाटकें होत.

कादंबरीच्या बाबतींतहीं इंग्रजी व संस्कृत भाषांतरद्वारा अशीच कामगिरी झाली आहे. सर वॉल्टर स्कॉट, सर बुल्वर लिटन, रेनाल्ड्स् यांच्या कादंबऱ्या व जॉन्सन्, डीफो, स्विफ्ट् आणि बनिअन् यांचे ग्रंथ, तसेंच बोकाशिओ, रेनान, आणि डयूमास वगैरे परकीयांचे ग्रंथ कादंबरीकारांस फारच उपयोगी पडले आहेत. कादंबरी, बृहत्कथासार, विश्वगुणादर्श, वगैरे संस्कृत ग्रंथांच्या भाषांतरानेंही मराठी कादंबऱ्यांत पुष्कळ भर पडली आहे.

तत्वज्ञान विषयावरील पुस्तकांत फारसें वैचित्र्य दिसून येत नाहीं. भगवद्गीता व तीवरील अनेक टीका यांवरच ग्रंथकारांची पुष्कळ मदार दिसून येते. बऱ्याचशा उपनिषदांचीही भाषांतरें झालेलीं आहेत. छांदोग्य, नारायण, ऐतरेय, तैत्तिरीय, आणि ईशावास्योपनिषद् हीं त्यांतील मुख्य होत. प्रचलित तत्वज्ञानाचा रोंख वेदान्ताकडे आहे. तरी पण पतंजलीचीं सटीक योगसूत्रें, आणि सर्वदर्शनसंग्रह ह्यांचींही भाषांतरें झालेलीं आहेत. रा. कुंट्यांची षड्दर्शनचिंतनिका हें बऱ्याच श्रमाचें फळ आहे. रा. शंकर पांडुरंग पंडितांच्या वेदार्थयत्नाप्रमाणेंच जरी षड्दर्शनचिंतिका अपूर्णच राहिली आहे, तरी ह्या दोन पुस्तकांच्या योगानें मराठी वाङ्मयांत फार मौल्यवान ग्रंथांची भर पडली यांत संशय नाहीं. पुराणांपैकीं रामायण, भागवत, मत्स्य व गणेश इ. पुराणांचीं भाषांतरें झालीं. शेवटल्या ग्रंथाचें श्रेय श्रीमंत बापूसाहेब पट

वर्धन कुरुंदवाडकर, यांस दिलें पाहिजे. त्यांची मराठी ग्रंथकार व कवि या नात्यानें सर्वत्र चांगली प्रसिद्धि आहे.

तत्वज्ञान विषयांत भाषांतररूपानें इंग्रजींतून आलेल्या ग्रंथांत स्पेन्सर यास अग्रमान मिळाला आहे. प्रो. माक्समूलर, जॉन् स्टयूअर्ट मिल्ल, आणि लॉर्ड बेकन हे त्याच्या खालोखाल येतात. याशिवाय मार्क्स आरिलियस् याचीं बोधवचनें आणि सिसरोचा ईश्वरावरील ग्रंथ ( Treatise on the god ) व इतर ग्रंथ यांचींही भाषांतरें झालीं आहेत.

एल्फिन्स्टनचा हिंदुस्थानचा इतिहास, ग्रँट डफ् व मरेचा इतिहास यांचीं भाषांतरें जीं पहिल्या काळांत झालीं म्हणून सांगितलीं, याशिवाय वर सांगितलेल्या ३० वर्षांत ग्रीस, रोम, कार्थेज, पर्शिया, आसीरिया, तुर्कस्तान, रशिया, स्पेन येथील मूर, इजिप्त, चीन यांच्या संक्षिप्त इतिहासांची मालिका व सिंहल-द्वीपाचा इतिहास असे ग्रंथ इतिहास विषयावर प्रसिद्ध झाले. हें काम मुख्यतः श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या उदार आश्रयाचें फल होय. त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

मेनचें व्हिलेज कम्युनिटीज् ( ग्रामसंस्था ), माशिआव्हेलीचें 'प्रिन्स' ( राजपुत्र ), सीलीचें एक्सपॅन्शन् ऑफ इंग्लंड ( इंग्लंडचा विस्तार ), या पुस्त-कांच्या भाषांतरांनीं महाराष्ट्र वाङ्मयांतील राजनीति विषयाची फारच उत्तम अभिवृद्धि झाली.

येथवर वर सांगितलेल्या तीस वर्षांत भाषांतरद्वारा मराठी वाङ्मयाची विशेष महत्वाची अभिवृद्धि कशी झाली याचें त्रोटक वर्णन झालें. एकंदरींत आमच्या उत्तम ग्रंथांत चांगली ठळक भर पडली आहे. आणि स्पेन्सर, माक्स्मूलर, मिल्ल, सीले, मेन, शेक्सपीयर, गोल्डस्मिथ, जॉन्सन् , सर वाल्टर स्काट, लॉर्ड बेकन, सर बूलवर, लिटन, बकल, डीफो, स्विफ्ट् , बनियन, स्माइल्स, आणि लबॉक, यांच्यासारख्यांच्या नमुनेदार ग्रंथाची ती भर आहे, हें आपल्या प्रचंड राष्ट्रीय जागृतीचें द्योतक होय. या जागृतीस जर वरिष्ठ विद्याधिकाऱ्यांकडून प्रोत्साहन मिळालें तर आमच्या वाङ्मयाच्या सर्व शाखा अर्वाचीन युरोपांतील अनेकविध व अपूर्व अशा ज्ञानफलांनीं अगदीं लौकरच लोंबून जातील यांत तिळप्राय संशय नाहीं. या प्रोत्साहनाच्या व प्रेरणेच्या अभावीं सुव्यवस्था व तारतम्य राखणें, आणि निरनिराळ्या ग्रंथकारांची व ग्रंथांची निवड करणें या गोष्टी

होणार नाहींत. वरील पुस्तकांत शालोपयोगी एकही पुस्तक नसल्यामुळें, तीं छापणाऱ्या ग्रंथकारांस, आपल्या श्रमाच्या व धाडसाच्या मोबदल्यासाठीं, केवळ सामान्य वाचकवर्गाच्या एकदेशीय आश्रयावरच अवलंबून रहावें लागलें. वाचनाच्या या अभिरुचीस योग्य वळण लावून प्रोत्साहन देण्याचें थोर कृत्य जर युनिव्हर्सिटीनें आपल्या हातीं घेतलें तर वाचकवर्गाची संख्या पुष्कळ वाढेल, आणि आपल्या गद्यवाङ्मयाची अभिवृद्धि सर्वदिशांनीं व योग्य प्रमाणानें लौकरच होईल अशी आशा बाळगण्यास फारशी हरकत वाटणार नाहीं. आणखीं चुकल्यामाकल्या ग्रंथकारांकडून कसें बसें होणारें सांप्रतचें अभिवृद्धीचें काम झपाट्यानें सुरू होऊन त्यास एक प्रकारची शिस्त लागेल. या योगानें संस्कृत ज्ञानामृताची जशी आम्हांस गोडी लागली आहे व तें जसें आम्हांस मानवलें आहे, त्याचप्रमाणें पश्चिम यूरोपांतील ज्ञानामृताचा तितक्याच रसिकतेनें आस्वाद घेण्याची व तें पचविण्याची पात्रता आम्हांस येईल.

येणेंप्रमाणें जुन्या मराठी ग्रंथाचें प्रकाशन, आणि संस्कृत व इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें, हे प्रमुख ओघ मिळाल्यामुळें मराठी भाषेच्या प्रवाहाचा विस्तार किती वाढला आहे याचें थोडेसें सविस्तर विवेचन झालें. आतां खऱ्या स्वतंत्र ग्रंथाच्या विवेचनाकडे वळूं. जुन्या गद्यपद्यग्रंथांचें प्रकाशन आणि इतर भाषांतील भाषांतरें यांची कोणी कशीही किंमत करो, परंतु एकाद्या देशांत विद्येची खरी कळकळ आहे कीं नाहीं व असल्यास ती कितकितपत जोमदार आहे याची परीक्षा करावयाची असल्यास त्या भाषेंत नवीन व स्वतंत्र ग्रंथांचीं विपुलता व विविधता किती आहे याची छाननी करणें हाच एक उत्तम मार्ग आहे. वास्तविक ह्मटलें तर हे स्वतंत्र ग्रंथ भाषेचा प्राणच होत; ह्मणून ह्या भागाचें विवेचन अत्यंत लक्षपूर्वक केलें पाहिजे. पुन्हा छापलेले ग्रंथ व भाषांतरें यांखेरीज वरील तीस वर्षांत नवीन प्रसिद्ध झालेले ग्रंथ जवळजवळ ५००० आहेत. यांपैकीं २२ वर्षांतील ( १८६५–७३ आणि १८८४–९६ ) ग्रंथांची सविस्तर माहिती उपलब्ध आहे, व तीवरून या पुस्तकांची विल्हेवारी करण्यास फार सोईचें झालें आहे. या कोष्टकांवरून असें दिसतें कीं या काळांत खालीं सांगितल्याप्रमाणें निरनिराळ्या विषयांवर ग्रंथ झाले; चरित्र ९६, नाटक ३३६, कादंबरी २७८, इतिहास १२०, भाषा

३६५, कायदा ४३, वैद्यक ७१, राजनीति २६, तत्त्वज्ञान ३७, धर्म ६७, शास्त्र ३२०, प्रवास १२, कविता ३५९; किरकोळ ११००, व शालोपयोगी ८००. निरनिराळ्या विषयांवरील पुस्तकांचें जें प्रमाण या २२ वर्षांत दिसून आलें तेंच सर्व तीस वर्षांच्या कालास लागू पडेल असा अदमास आहे. या प्रमाणांवरून विद्वानांनीं आपल्या प्रयत्नांचा मुख्य रोंख मराठी वाङ्मयाच्या उणीवा भरून काढण्याकडे धरिला होता; व ज्या गोष्टींची त्यांत अगोदरच रेलचेल होती त्यांकडे त्यांनीं आपलें लक्ष कमी पुरविलें असें सिद्ध होतें. किरकोळ पुस्तकें व शालोपयोगी पुस्तकें वजा जातां–आणि हीं सर्व पुस्तकांच्या चवथ्या हिशानें आहेत–बाकीच्या नवीन पुस्तकांत चरित्र, शास्त्र, तत्त्वज्ञान, धर्म, राजनीति, कायदा, वैद्यक आणि प्रवास या विषयांवरील ग्रंथसंख्या असावी त्याहून बरीच कमी आहे.

प्रथमतः चरित्रांकडे वळूं. पूर्वीच्या ५० वर्षांच्या काळांत, वर सांगितल्याप्रमाणें फक्त ५ च चरित्रें प्रसिद्ध झालीं होतीं; परंतु पुढल्या तीस वर्षांत या संख्येंत बरीच भर पडली आहे. १८६४ च्या पूर्वीं जीं पांच चरित्रें झालीं त्यांची निवड कांहीं विशिष्ट तत्त्वावर झालेली दिसत नाहीं; परंतु हल्लीं चरित्रमालिकेंत एक प्रकारची शिस्त व वैचित्र्य दिसून येतें; व लेखकांनीं थोर चरित्रनायकांची निवड करितांना स्वदेशाकडे व यूरोप अमेरिकादि परदेशांकडे योग्यप्रमाणानें लक्ष पुरविलें आहे. असें आढळतें. यांपैकीं यूरोपीय थोर माणसांचीं चरित्रें महाराणी व्हिक्टोरिया, शेक्सपीयर, वुइल्यम् पिट, लॉर्ड बेकन, जोनाथन् स्विफ्ट् सर ऐझाक न्यूटन्, गोल्डस्मिथ, कॉब्डन, क्याप्टन कुक्, डॉ. लिव्हिंगस्टन ब्राडलॉ, अनिबिझांट, व इतर थोर इंग्रज ग्रहस्थांचीं मागल्या पिढींतील आंग्लोइंडियन कामगारांपैकीं लॉर्ड क्लाईव्ह, सर थामस मनरो या गृहस्थांचीं; अमेरिकेंतील पुढारी लोकांपैकीं जॉर्ज वाशिंग्टन, बेंजामिन फ्रांकलिन, व अध्यक्ष लिंकन आणि गारफिल्ड यांचीं; आलेक्झांडर दि ग्रेट, सॉक्रेटीस, डेमॉसेथनिस वगैरे ग्रीक ग्रहस्थांचीं; नेपोलियन बोनोपार्ट, पीटर दि ग्रेट, रशियाची काथेराईन राणी, कोलंबस वगैरे यूरोपीय माणसांचीं चरित्रें यांत आलीं आहेत. हिंदुस्थानांतील थोर माणसांत साधु, संत, कवि व धर्मसंस्थापक यांस अग्रमान मिळाला आहे. रामदास, एकनाथ, ज्ञानेश्वर, तुकाराम, वामनपंडित, जयरामस्वामी, नामदेव, बुद्ध, शंकराचार्य, राजा राममोहनराय या प्रत्येकास

चरित्रनायकाचा मान मिळाला आहे. यांच्या खालोखाल मराठ्यांच्या इतिहासांतील प्रसिद्ध पुरुषांस मान मिळाला आहे. शिवाजी व त्याच्या नंतरचे तीन राजे, पहिले दोन पेशवे, मल्हारराव होळकर, महादजी शिंदे, नाना फडणवीस, अहिल्याबाई, हरिपंत फडके, परशुराम भाऊ पटवर्धन, आणि बापू गोखले ही मंडळी आमच्या ग्रंथकारांची फार आवडती दिसते. दादाभाई नवरोजी, गवरीशंकर उदेशंकर, बाळशास्त्री जांभेकर, झांशीची राणी, वगैरे अर्वाचीन मोठ्या माणसांचीं चरित्रें झालीं आहेत. हिंदुस्थानांतील मुसलमानी राजांत अकबर व औरंगझेब यांचीं पृथक् चरित्रें झालीं आहेत. यांपैकीं महादजी शिंदे, परशुरामभाऊ पटवर्धन, नाना फडणवीस, एकनाथ वगैरे थोर व्यक्तींचीं चरित्रें तर दोन दोन तीन तीन चरित्रकारांनीं पृथक् वर्णिलीं आहेत; आणि यांपैकीं कांहीं चरित्रें इतकीं लोकप्रिय झालीं आहेत कीं त्यांच्या कित्येक आवृत्त्या निघाल्या आहेत. एकंदरींत चरित्रकारांनीं आपल्या ग्रंथांनीं मराठी वाङ्मयाची फारच उत्तम सेवा केली आहे.

या ग्रंथकारांच्या नांवाचा विचार नीट लक्ष देऊन केला असतां जी एक गोष्ट सुचते तिचा येथें उल्लेख करणें फायदेशीर आहे. ती गोष्ट ही कीं वर सांगितलेल्या ७० चरित्रकारांत पदवीधरांची संख्या जेमतेम सात आहे— भानु, पावगी, नातु, कानिटकर, माडगांवकर, लक्ष्मण कृष्ण चिपळूणकर आणि गुंजीकर—बाकीच्या ६३ त कांहीं युनिव्हर्सिटींत गेलेले व कांहीं न गेलेले आहेत. भाषांतरकारांत पदवीधरांची बरीच भरती दिसते. संस्कृत किंवा इंग्रजी ग्रंथाचीं भाषांतरें करणाऱ्या सुमारें ७६ भाषांतरकारांत आपल्या फार नामांकित अशा २५ पदवीधरांचीं नांवें आहेत. त्यांपैकीं येथें कांहींचा केवळ नामनिर्देश मात्र केला आहे. तेः—पंडित, कुंटे बंधुद्वय, का. त्रिं. तेलंग, रा. महाजनि, आगरकर, ज. म. गाडगीळ, आपटेद्वय, रा. आगाशे, रा. भानु, रा. पावगी, रा. रानडे, रा. पटवर्धन, रा. कोल्हाटकर, रा. बोडस, रा. फडके, रा. कानिटकर, डॉ. गर्दे, सखाराम अर्जुन, पांडुरंग गोपाळ, शिवळकर, भिकाजी अमृत, आणि भाटवडेकर. इकडे भाषांतराच्या बाजूला पदवीधर आणि बिनपदवीधर याचें प्रमाण १:३ ( ७५ पैकीं २५,२६: ५० ) तर तिकडे चरित्रांच्या बाजूला वर सांगितल्याप्रमाणें तें १:९ ( ७० पै.७ ७:६३ असें आहे. ह्यावरून त्यांनीं चरित्रांकडे विशेष लक्ष दिलेलें दिसत नाहीं.

या भिन्न प्रमाणांवरून होणारा बोध अगदीं स्पष्ट असल्यामुळें त्यासंबंधीं जास्त लिहिणें नलगे.

आतां चरित्रविवेचनानंतर सहजच इतिहासविवेचनाची पाळी येते; कारण इतिहास ह्मणजे राष्ट्राचें चरित्र होय. पहिल्या ५० वर्षांच्या कालांत मरेकृत इतिहासावरून भाषांतर केलेला बाळशास्त्री जांभेकरांचा 'हिंदुस्थानचा इतिहास', एल्फिन्स्टनच्या 'हिंदुस्थान' या पुस्तकाचें भाषांतर, आणि हरि केशवजी यांचा इंग्लंदच्या इतिहासाचें संक्षिप्त वर्णन इतकेच ग्रंथ काय ते इतिहास या सदराखालीं झाले होते. त्यानंतरच्या ३० वर्षांत जुन्या गद्यात्मक बखरी प्रसिद्ध केल्या गेल्या हें वरती आलेंच आहे. या बखरींचा संग्रह बराच मोठा झाला आहे. याशिवाय इंदूरचे माजी दिवाणसाहेब रा. कीर्तने यांनीं मालकम साहेबांच्या मूळ ग्रंथावरून भाषांतररूपानें केलेला 'मध्यहिंदुस्थानचा इतिहास', तुर्क व राशियन लोकांचे लढाईचा इतिहास, फ्रान्स देशांतील राज्यक्रान्तीचा व फ्रान्स व जर्मनीच्या युद्धाचा असे दोन संक्षिप्त इतिहास; आणि मुख्यत्वें 'राष्ट्रांची कहाणी' (Story of the nations) या इंग्रजी ग्रंथमालेच्या आधारानें लिहिलेलें ग्रीस, रोम, फ्रान्स, जर्मनी, पर्शिया, इजिप्त, कार्थेज, असीरिया, तुर्कस्थान, राशिया आणि स्पेन या देशांचे इतिहास, वगैरे पुस्तकें प्रसिद्ध झालीं. गोवें, सिंहलद्वीप, कूर्ग, भोपाळ, बुंदेलखंड, कोल्हापुर, दक्षिणमहाराष्ट्रांतील संस्थानें इत्यादिकांचे पृथक् इतिहास, शिपायांच्या लढाईचा इतिहास, ख्रिस्ती मंडळींची बखर (Christian Church,) व विंचूरकर, दाभाडे, आंग्रे आणि शिंदे यांच्या घराण्यांचे सविस्तर इतिहास वगैरे आणखी ग्रंथही तयार झाले. इतिहास विषयावर झालेले हे मुख्य ग्रंथ होत; इतर पुस्तकें शालोपयोगी ग्रंथांत मोडतात. या इतिहासांचे कर्ते म्हणून जीं २५ नांवें उपलब्ध जाहेत. त्यांत फक्त पांचच गृहस्थ पदवीधर आहेत तेव्हां चरित्रप्रकर्णीं दिलेल्या मतास यांवरूनही पुष्टि येते.

इतिहासानंतरची पाळी राजनीतीची होय. १८६४ पूर्वीं राजनीतीवर एकही पुस्तक प्रसिद्ध झालेलें नव्हतें. परंतु त्यानंतर भाषांतरद्वारा अथवा स्वतंत्र रीतीनें या विषयांत झालेले प्रयत्न चांगले दृग्गोचर होऊं लागले. केवळ कांग्रेसचे रिपोर्ट बाजूला ठेविले तरी या विषयावर बऱ्याच योग्यतेचे असे २० ग्रंथ झाले. 'इंडिया अँड कॉलनीज' ('हिंदुस्थान व ब्रिटिश वसाहती')

या नांवाच्या इंग्रजी ग्रंथाचें रा. नाटेकर यांनीं केलेले भाषांतर; प्रो. कर्वे व रा. पटवर्धन यांचा ‘राजनीतीचीं मूलतत्त्वें’ का. त्रि. तेलंग यांचें ‘स्थानिक स्वराज्य’ ‘माशिआव्हेलीचा राजपुत्र’ मेनची ‘ग्रामसंस्था, ( Village Communities ); डी. लोमच्या ( Lolme ) ‘कान्स्टीटयूशन ऑफ इंग्लंड ( ब्रिटिश राज्यव्यवस्था ) या पुस्तकाचें रा. वागळे यांचें भाषांतर, ‘ करपद्धतीचीं तत्वें ’ ( Principles of taxation ), रा. महाजनींचें बंगाल्यांतील जमीनदारी वहिवाट’ ( The land tenure of Bengal ), रा. सोमणांचें ‘ हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यव्यवस्थाविषयक आंकडे ’ ( The statitstics of British Indian Administration ) व ‘ हिंदु-‘स्थानचें दारिद्र्य, ’ पंडिता रमाबाईचें ‘अमेरिका व तेथील लोक’ (America and the people); मोर्लेसाहेबांच्या ‘ कॉम्प्रमाइज ( तडजोड ) ’ ह्या पुस्तकाचें भाषांतर, ‘ धान्याचा कायदा ’ ( Corn Law ); ‘ अनियंत्रित व्यापार’ (Free trade) यावरील चोपडीं, हिंदुस्थानांतील विद्यमान राज्यें, संस्थानें व जहागिरी यांचा इतिहास ( History of the Native States in their relation to the Govt. ); मिल्लचें ‘स्वातंत्र्य ’ आणि सीली साहेबांचें ‘ इंग्लंद देशाचा विस्तार ’ वगैरे पुस्तकें त्यांत येतात. राजनीतिशिक्षणाच्या अभिवृद्ध्यर्थ जीं पुस्तकें अलीकडे प्रसिद्ध झालीं आहेत त्यांत हीं अत्यंत नामांकित होत.

भाषांतररूपानें आलेल्या कायद्याच्या पुस्तकांसंबंधीं जें कांहीं सांगितलें आहे त्याहून ज्यास्त या बाबतींत सांगण्याची जरूरी दिसत नाहीं. या विषया वर खरें स्वतंत्र असें एकही पुस्तक झालेलें नाहीं.

टॉर्ट ( अपकृत्य ), कॉंट्राक्ट ( करारशास्त्र ), हिंदुलॉ ( हिंदुधर्मशास्त्र ), महामेडन लॉ, यांचीं भाषांतरें, तशींच संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें, यांत कर्त्यांची मोठीशी स्वतंत्र कल्पना दिसून येत नाहीं. अथवा त्यांनीं त्या कामांत मोठेसे परिश्रम घेतले आहेत असेंही ह्मणतां येत नाहीं. इंग्रजी भाषेच्या ज्ञानाचा प्रसार अधिकाधिक होऊं लागल्यापासून व कोर्टांत आणि आफिसांतही तिचा प्रचार पडूं लागल्यापासून अशा ग्रंथांची मागणीही कमीच होऊं लागली आहे.

वैद्यक विषयांत, त्याच्या जोडीच्या कायद्याच्या विषयापेक्षां, उपयुक्त भाषां-तरांचें व स्वतंत्र ग्रंथांचें प्रमाण अधिक दिसून येतें. या ग्रंथांवरून पदवीधर

डॉक्टरांनीं वकील मंडळीपेक्षां अधिक विद्याव्यासंग चालू ठेविला होता हेंही व्यक्त होतें. रजिस्ट्रार आफ नेटिव्ह पब्लिकेशन्स यांनी ज्या विशिष्ट ७१ ग्रंथांची नोंद केली आहे त्यांपैकीं पदवीधर डॉक्टरांनीं २० ग्रंथ लिहिले आहेत. कै० डा० कुंटे, गोपाळ शिवराम, गोखले, नारायण दाजी, शिवळकर, सखाराम अर्जुन व बुलेल आणि डा. भिकाजी अमृत डा. भालचंद्र कृष्ण भाटवडेकर, आणि डा. गर्दे वगैरे मंडळींचीं नांवें त्या ग्रंथकारांत आहेत. या वैद्यक ग्रंथांतील विषय येणेंप्रमाणें आहेतः—(Practice of medicine ) वैद्यतत्व; (Anatomy) शारीरशास्त्र; ( Midwifery) सूतिकाशास्त्र; ( Medical Jurispurdence ) न्यायवैद्यक,( Surgery शस्त्रवैद्यक; (Mateira Medica) औषधींचें वर्गीकरण; (Physiology) मानुष इंद्रियविज्ञानशास्त्र; आणि (Diseases of women) स्त्रीरोगचिकित्सा. ह्मणजे वास्तविक या ग्रंथांत सर्व वैद्यक आलें आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. याशिवाय ( Homeopathy ) होमिओपथी, महामारी, देवी आणि 'आर्यौषधींचे गुण' या विषयांवरही पुस्तकें झालीं आहेत. डा. कुंट्यांनीं 'वाग्भट्ट' प्रसिद्ध करून व डा. गर्दे यांनीं या आर्यवैद्यकावरील सर्वसंग्राहक ग्रंथांचें भाषांतर करून फारच मोठी कामगिरी केली आहे. वैद्यकसदराखालीं घातलेलीं बाकी राहिलेलीं सर्व ५० पुस्तकें देशी वैद्यांनीं लिहिलेलीं आहेत. या ग्रंथांच्या संख्येवरून–जरी त्यांतील विषय विवेचनावरून नाहीं तरी– लोकांच्या मनावर जुन्या वैद्यकाची छाप अद्यापि किती आहे हें दिसून येतें.

तत्वज्ञान आणि शास्त्र या विषयांवरील बहुतेक ग्रंथ भाषांतरात्मक अथवा रूपांतरात्मक आहेत. रा. मराठे यांचीं ज्योतिषशास्त्र, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र; ( Physiology ) मानुषइंद्रियविज्ञानशास्त्र, तर्कशास्त्र; रा. गोळे यांचें 'हवा', सरदेसाई यांचें 'पाणी', प्रो. मोडक यांचीं 'सृष्टिशास्त्र आणि रसायनशास्त्र;' रा. धारप यांची 'सूर्यमाला', प्रो. मोडक यांचीं 'प्रकाशक आणि ध्वनि,' रा. काणे यांचीं 'भूस्तरविद्येचीं मूलतत्वें;' रा. बी. ए. गुप्ते यांची 'कृषिकर्म विद्या आणि रसायनसास्त्र.' रा. सहस्रबुद्धे यांचें 'भूवर्णन', ( Physical geography ), वगैरे पुस्तकें मुख्यत्वें शास्त्रीय बालबोध मालेच्या आधारें लिहिलेलीं आहेत. या पुस्तकांची भर आमच्या मराठींत फार परिश्रमानें घातल्याबद्दल आह्मीं रा. मराठे, गोळे, सहस्रबुद्धे, सरदेसाई, धारप, काणे, आपटे, केळकर आणि डा. छत्रे यांचें अत्यंत आभारी आहोंत.

विद्युत्, लोहचुंबक, उष्णता आणि कोळसा या विषयांवरही पुस्तकें झालीं आहेत. या पुस्तकांपैकीं प्रो. मोडक यांचीं रसायनशास्त्र व सृष्टिशास्त्र ( Natural Philosophy ) हीं पुस्तकें केवळ बालबोध पुस्तकांहून ज्यास्त योग्यतेचीं असून प्रमाणार्ह आहेत. ज्योतिःशास्त्रावर बालबोध मालेशिवाय रा. दीक्षित, केळकर व चिटणीस यांचे स्वतंत्र ग्रंथ झाले आहेत. रा. दीक्षितांचें ज्योतिर्विलास हें पुस्तक चांगलें वाचनीय असून मनोवेधक आहे. याच ग्रंथकारानें 'भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास' ह्मणून आणखी एक पुस्तक फार परिश्रम घेऊन लिहिलें आहे. कै. ज. बा. मोडक यांनीं भास्कराचार्यांच्या ग्रंथांतील ज्योतिषशास्त्राच्या भागाचें व वेदांगज्योतिषांचेंही भाषांतर केलें. रा. दीक्षित आणि मोडक यांनीं ज्योतिषांतर्गत गणितांत निरयणपद्धतीऐवजीं सायनपद्धतीचा प्रचार सुरू व्हावा व तदनुरूप पंचांगाचें संशोधन व्हावें ह्मणून आमरण तरफदारी केली. नीतिशास्त्राचीं मूलतत्वें ( Data of Ethics ) या स्पेन्सरच्या ग्रंथांचें भाषांतर-प्रो. भानूंचें 'न्याय शास्त्राचीं मूलतत्वें;' स्पेनसरच्या 'शिक्षण' या ग्रंथाचें सहस्त्रबुद्ध्यांचें भाषांतर; रा. फडके यांची स्पेन्सेरीय सूत्रमाला—वगैरे पुस्तकें मानसशास्त्र आणि नीतिशास्त्र या सदराखालीं नोंदलेलीं आहेत. रा. बोडस यांची अद्वैतमीमांसा, व माक्समूलर साहेबांच्या हिब्बर्ट व्याख्यानांचें रा. कानिटकरांचें भाषांतर हीं पुस्तकेंही या ठिकाणीं नमूद करण्याच्या लायकीचीं आहेत. रा. ग. ज. आगाशे यांचें अर्थशास्त्र हें अर्थशास्त्रावरील उत्तम पुस्तक होय. रा. मुळे यांच्या हिंदुस्तानांतील सांपत्तिक द्रव्यें ( Industrial wealth ) आणि रा. गुप्ते यांच्या 'हिंदुस्थानांतील देशी कारागीरीचें वर्णन' हीं पुस्तकें फारच उपयोगाचीं झालीं आहेत. वर सांगितल्याप्रमाणें वाङ्मयाच्या याच दिशेकडे पदवीधरांचें लक्ष विशेष लागलें आहे असें दिसतें. सर्वोत्तम म्हणून जेवढे ग्रंथ आहेत तेवढे त्यांचेकडूनच झालेले आहेत, व योग्यतेच्या आणि संख्येच्या मानानेंही त्यांचें प्रमाण पुष्कळ दिसून येतें. हुन्नरीवरही कांहीं उपयुक्त ग्रंथ झाले आहेत. रा. गुप्ते व राजे यांचें 'कृषिकर्मविद्या' रा. घारपुरे यांचें गायनवादन ( Instruments and vocal music ) पार्वतीबाईचें 'सूपशास्त्र' आणि रुक्मिणीबाईचें 'शिवणकाम' वगैरे पुस्तकें या वर्गांतील होत. याशिवाय चित्रकला ( Drawing ); मल्लविद्या, तारा-

यंत्र, आगगाड्या, कांच, फटाके वगैरे दारुसामान, रंगविणें, वगैरे विषयांवरही स्वतंत्र ग्रंथ झाले आहेत.

येणेंप्रमाणें चरित्र, इतिहास, राजनीति, कायदा, वैद्यक, तत्वज्ञान, शास्त्र आणि कला वगैरे विषयांचें पर्यालोचन झालें. नाटक, कादंबरी, व गद्य निबंध, ह्या राहिलेल्या तीन विषयांचें विवेचन पुढील भागांत येईल.

---

### भाग ४ था.

# नाटकें कादंबऱ्या आणि गद्य निबंध.

मराठी वाङ्मयाच्या ज्या सर्व शाखांचें—ह्मणजे चरित्र, इतिहास, राजनीति, कायदा, वैद्यक, तत्वज्ञान, शास्त्र आणि हुन्नर वगैरेचें–वरतीं पर्यालोचन केलें आहे, त्या शाखांत स्वतंत्र रचनेची स्फूर्ति इंग्रेजी वाङ्मय अथवा शास्त्र यांच्या अध्ययनानेंच मुख्यत्वें झालेली आहे. हे ग्रंथ जरी केवळ भाषांतरात्मक नाहींत तरी त्यांपैकीं पुष्कळांत नवीन संस्कृतीची झांक स्पष्टपणें मारते; आणि ह्मणूनच ज्या परकीय नमुन्यांवरून अथवा मूळग्रंथांवरून ते तयार केलेले आहेत त्यांचा ठसा त्यांत उठलेला दिसतो; आणि कांहीं अंशीं असा प्रकार होणें अपरिहार्यही आहे. या शाखांतील ग्रंथ, जुनें नवें व पूर्व पश्चिम, यांच्या संयोगाचे द्योतक आहेत; आणि त्यांत नव्या व पाश्चिमात्य विचारपद्धतीचा पगडा जुन्या व राष्ट्रीय विचारसरणीवर असावा हें सहाजिक आहे. अशा परिस्थितींत राष्ट्राची बुद्धिमत्ता दर्शविणारी खरी स्वतंत्र ग्रंथरचना नाटकें, कादंबऱ्या व सामान्य गद्य वाङ्मय यांतच आढळून येण्यासारखी असते. कारण या विषयांत राष्ट्रीय भावनांस आपले विशिष्ट गुण प्रदर्शित करण्यास पूर्ण अवसर सांपडतो, आणि भाषांतरापासून होणाऱ्या स्फूर्तींचें वर्चस्व या विषयांत इतर विषयांपेक्षां कमी असतें.

नाट्यावर मराठींत पुरातन स्वतंत्र ग्रंथ मुळींच नव्हते हें सांगितलेंच आहे. याचें कारण एवढेंच कीं महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाकडे लक्ष दिलें असतां

त्यांत लोकशिक्षणाचें व लोकरंजनाचें कार्य रंगभूमीच्या द्वारा करीत असल्याचा परिपाठ दिसून येत नाहीं. पहिल्या ५० वर्षांत या दिशेनें झालेली प्रगति रा. परशुरामपंत गोडबोले व दुसरे इतर शास्त्री यांनीं संस्कृतावरून केलेल्या १० नाटकांच्या रूपानें दिसून येते. त्यानंतरच्या तीस वर्षांत भाषांतररूपानें झालेल्या नाटकांची संख्या सुमारें तीस होती व ती फारशी मोठी आहे असें नाहीं. तथापि या ग्रंथांत शेक्सपीयर व गोल्डस्मिथ यांच्या नाटकांची व संस्कृतांतील थोड्या उत्कृष्ट नाटकांचीं भाषांतरें आलीं आहेत. स्वतंत्र नाटकें सुमारें ३०० शें असून ह्या संख्येचें प्रमाण भाषांतररूपानें झालेल्या नाटकांच्या संख्येहून अतिशयच मोठें आहे. यावरून विद्वानांचा ओढा या विषयाकडे विशेष आहे हें निर्विवाद सिद्ध होतें. आणि त्या अभिरुचीचें, व जी पेरणी त्यावेळीं झाली तिचें पीक पुढें अलोट आलें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. सांगली येथें स्थापन झालेली पहिली नाटकमंडळी पुणें मुंबई येथें १८५३ मध्यें येऊन नाटकद्वारा लोकांच्या मनोरंजनाचें काम करूं लागली, त्यावेळीं तीं पहाण्यासाठीं लोकांच्या किती उड्यावर उड्या पडत याची आठवण हल्लीं हयात असलेल्या त्यावेळच्या लोकांस होत असेल. या नाटकमंडळीनें जो या कामीं हिय्या केला त्याबद्दल त्यांस लोकाश्रयद्वारा उत्तम मोबदला मिळाला. कारण पूर्वीं उत्सवांत व जत्रांत होणाऱ्या दक्षिण कर्नाटकांतील लोकांच्या दशावतारी नाटकांपेक्षां या नाटकांत प्रेक्षकांचें मनोरंजन अधिक होत असे. सांगली येथील मंडळीस उत्तम लोकाश्रय मिळत आहे हें पाहून दुसऱ्या अनेक मंडळ्यांनीं तिचें अनुकरण केलें; व सर्व मोठमोठ्या शहरांतून नाटकगृहें बांधण्यासही सुरवात होऊं लागली, आणि आतां तर एक दोन नाटकगृहें नाहींत असें एकही मोठें शहर सांपडणार नाहीं. सांगली येथील नाटकमंडळीचे रा. विष्णुपंत भावे ह्मणून कोणी एक पुरस्कर्ते होते. त्यांना या धंद्यांत यश मिळालेलें पाहून त्यांचे ज्या मंडळीनें अनुकरण केलें त्यांत रा. किर्लोस्कर, डोंगरे, पाटणकर, साठे वगैरे मंडळी विशेष नांव घेण्यासरखी होती. या नवीन उत्पन्न झालेल्या नाटकाच्या अभिरुचीमुळें नाट्यवाङ्मयाच्या अभिवृद्धीस चांगलें उत्तेजन मिळालें. प्रारंभीं नाटकमंडळीच्या व्यवस्थापकाचें व नाटकें लिहिण्याचें काम बहुधा एकाच व्यक्तीकडून होत असे, परंतु अलीकडे हीं दोन्हीं कामें पृथक माणसांकडून केलीं जातात. पूर्वींचीं नाटकें मुख्यत्वें महाभारतरामायणादि पौराणिक गोष्टींच्या संविधानावर रचलेलीं असत; आणि अझूनही मराठी भाषेंतील एकंदर नाटकांत पौराणिक नाटकांचाच भरणा जास्त दिसून येईल.

तरी पण मध्यंतरीच्या तीस चाळीस वर्षांत तीन बाबतींत चांगली सुधारणा झाल्याचें स्पष्टपणें दिसून येतें. कांहीं नाटकमंडळींनीं गायनवादनाची नवीन टूम काढून केवळ संगति नाटकें करणाऱ्या संगीत मंडळ्या स्थापिल्या. या संगीतमंडळ्या काढण्याचें सर्व श्रेय रा. आण्णासाहेब किर्लोस्कर यांसच दिलें पाहिजे. आण्णासाहेबांच्या प्रयत्नांस यश आलेलें पाहून त्यांचें अनुकरण करणाऱ्या शेंकडों संगीतमंडळ्या उदयास आल्या. रजिस्ट्रार आफ नेटिव्ह पब्लिकेशन्स यांनीं विशेषतः ज्या २५० नाटकांची नोंद करून ठेविली आहे त्यांत सुमारें ५३ नाटकें संगीत आहेत, आणि त्यांपैकीं कांहीं उत्तम नाटकें ऑपेरा नाटकांचे देशी मासले आहेत असें ह्मणण्यास हरकत नाहीं. संगीत नांवाखालीं मोडणाऱ्या नाटकांपैकीं पुष्कळशीं नाटकें वाङ्मयाच्या दृष्टीनें अगदीं कुचकिंमतीची आहेत. तथापि किर्लोस्करांचीं शाकुंतल सौभद्र व रामराज्यवियोग हीं तीन नाटकें नाट्यप्रिय लोकांस अद्यापि अत्यंत प्रिय आहेत

जुन्या पद्धतीच्या व कंटाळवाण्या नाटकांच्या शेवटीं हास्यकारक फार्स करण्याची आणखी एक नवीन टूम सुरू झाली. या फार्सांना प्रहसनें असें म्हणतात. अशा प्रकारचीं तीस प्रहसनें यादींत नमूद केलेलीं आढळतात. प्रहसनें लिहिणें हाच या ग्रंथकारांचा चरितार्थाचा धंदा होता असें दिसतें. तिसरी जी विशिष्ट गोष्ट सांगावयाची आहे ती याच गोष्टीच्या अंगभूत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें पौराणिक नाटकें मागें पडून हळू हळू प्रहसनांचें माहात्म्य वाढूं लागलें, त्याप्रमाणेंच पुढें प्रहसनांची जागा सामाजिक व राजनीतिविषयक नाटकांनीं पटकाविली. यादीमध्यें एकंदर २५० नाटकांची जी नोंद झाली आहे, त्यांपैकीं जवळजवळ १०० नाटकांचें संविधानक पुराणेतर विषयांवर रचलेलें आहे. त्यांपैकीं बरींचशीं शेक्सपीयरच्या नाटकांचीं भाषांतरें असून त्यांपैकीं कांहींचे प्रयोगही रंगभूमीवर चांगले वठले आहेत. बाकीच्यांत कांहीं ऐतिहासिक नाटकें असून त्यांत अफझूलखानाचा मृत्यु व नारायणराव पेशवे यांचा मृत्यु, थोरले माधवराव पेशवे यांच्या पत्नीचें सतीगमन वगैरे मराठ्यांच्या इतिहासांतील मनाची खळबळ करून सोडणारे विषय आले आहेत. परंतु एकंदरींत बऱ्याचशा नाटकांचा रोंख सांप्रत स्थितीकडे असून त्यांत बालविवाह, पुनर्विवाह, जरठविवाह व स्त्रीशिक्षण इत्यादि विषयांवर जे सुधारक दुर्धारकांत झगडे चालले होते त्यांचें चित्र काढिलेलें आहे, व यांपैकीं बहुतेकांचा सुधारणा व सुधारक यांवरच कटाक्ष आहे.

यावरून या विषयांत प्रस्तुत रिपोर्टाच्या पूर्वींच्या तीस वर्षांत अशारीतीनें पुष्कळ प्रगति झाली हें दिसून येईल. नाटकांत उच्च प्रतीच्या गाण्याची भर पडून सामाजिक, राजकीय व नैतिक विषयांचा त्यांत हळुहळु अंतर्भाव होऊं लागल्यामुळें नाट्यकलेची सुधारणा झाली. एकंदरींत या बाबतींत झालेल्या प्रयत्नांवरून भविष्यत् कालांत नाट्यकलेला चांगलें उर्जित स्वरूप प्राप्त होईल अशी आशा वाटूं लागली. त्यामुळें लोकांच्या अभिरुचीस सुसंस्कृत व उच्च प्रतीचें वळण लागून उदात्त विचारांची अभिवृद्धि होण्यास चांगला अवकाश मिळाला यांत बिलकूल संशय नाहीं. एकंदरीनें विचार करितां ही अभिवृद्धि समाधानकारक आहे, परंतु प्रसिद्ध झालेल्या यादीवरून ज्या १५० नाटककारांचीं नावें उपलब्ध होतात त्यांत युनिव्हर्सिटींतील फक्त अकरा पदवीधरांचीच नांवें आढळून यावीं हीच एक कायती निराशा उत्पन्न करणारी गोष्ट होय. रा.कानिटकर, आगरकर, रानडे, महाजनी, कोल्हाटकर, राजाध्यक्ष,वागळे, केळकर, पितळे, सामंत आणि काळे, यांच्यासारख्या प्रसिद्ध माणसांची नांवें यांत आलीं आहेत खरीं, परंतु यांपैकीं शं. मो. रानडे यांखेरीज सर्वांचा भर विशेषतः भाषांतराकडेच आहे. रा. परशुरामपंत गोडबोले;वि.ज. कीर्तने, देवल, खरे, कानिटकर,केळकर आणि रानडे यांचीं भाषांतरें लोकादरास फारच पात्र झालीं आहेत. स्वतंत्र नाट्यरचनेंत इंदूरचे दिवाण व बडोद्याचे नायब दिवाण मोठे कीर्तने यांचाच नंबर पहिला लागतो व तें यथायोग्य ही आहे. रानडे, देवल, किर्लोस्कर आणि कानिटकर ह्यांचीं नाटकेंही उत्तमांमध्येंच गणिलीं जातात. इंग्रजी नाट्यकलेच्या दृष्टीनें पाहूं गेलों असतां आपल्याकडील प्रधान नाटकें हीं गौणच ठरतील, हें सहाजिक आहे. परंतु जी नाट्यकला इंग्लंडांत आज शेंकडों वर्षें वृद्धिंगत होत आहे तिच्याशीं नुकत्याच जन्म पावलेल्या इकडील नाट्यकलेची तुलना करणें वाजवी होणार नाहीं. परंतु, स्वतंत्र नाट्यरचना व युनिव्हर्सिटीशिक्षण यांच्यामध्यें जी फारखत झाली आहे तिच्या योगानें ज्यांना ज्यांना आमच्या राष्ट्रीय वाङ्मयाच्या अभिवृद्धीची कळकळ वाटत आहे त्यांना त्यांना अत्यंत काळजी वाटल्यावांचून राहणार नाहीं ही गोष्ट त्याबरोबरच उघड आहे.

**कादंबऱ्याः**—नाटकांविषयीं जे विचार वरतीं प्रदर्शित केले आहेत तेच बहुतांशीं कादंबऱ्यांसही लागू पडतात; मात्र नाटकांप्रमाणें कादंबऱ्या आमच्या पुरातन वाङ्मयास माहीत नव्हत्या असें नाहीं. इंग्रजींतल्या ‘ फेअरीटेल्स ’ चा मासला आमच्या वेताळपंचविशी, विक्रमबत्तिशी, शुकबहात्तरी वगैरे गोष्टीं-

च्या पुस्तकांत आढळतो. तेव्हां या दिशेनें प्रथमतःजे प्रयत्न झाले ते बहुधा अशाच तऱ्हेच्या गोष्टी लिहिण्याचे झाले. आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी, हतीमताई, आणि पर्शिअन् भाषेंतील गोष्टी वगैरे ग्रंथ हें त्या प्रयत्नाचें फळ होय. पहिल्या पन्नास वर्षांत चार पांच ग्रंथ होऊन आधुनिक मराठी कादंबऱ्यांस त्यावेळीं नुकतीच सुरुवात झाली होती. व पुढील तीस वर्षांत त्यांत इतकी भर पडली कीं त्यांची संख्या ३०० वर गेली. यांपैकीं सुमारें १८२ कादंबऱ्यांची रजिस्ट्रार आफ नेटिव्ह पब्लिकेशन्स यांनीं आपल्या यादींत व रिपोर्टांत विशेष स्तुति केली आहे. नाटकांपेक्षां कादंबऱ्यांत भाषांतरावर अधिक भर दिसून येतो. संस्कृत, उर्दू व पर्शिअन भाषांतील नमुन्यांवर बऱ्याच मनोरंजक कादंबऱ्या झाल्या आहेतच पण सर वाल्टर स्कॉट, बुलवर, लिटन, रिनॉल्ड्स, जॉन्सन,स्विफ्ट् ,डिफो, वगैरे इंग्रज ग्रंथकारांचें व बोक्याशिओ आणि ड्यूमास सारख्या इटालियन व फ्रेंच ग्रंथकारांचें अनुकरण करण्याचीही कांहीं मराठी कादंबरीकारांस स्फुर्ति झालेली दिसून येते. असें आहे तरी मराठी कादंबऱ्यांत स्वतःचा असा कांहीं विशिष्ट गुण आहेच. नाट्यग्रंथांप्रमाणेंच त्यांचेही दोन भाग करितां येतात.

प्रेमाच्या द्वारा मनुष्याचे सामान्य धर्म जागृत करणाऱ्या व देशकालवर्तमान ह्या गोष्टींनीं अबाधित अशा कादंबऱ्या पहिल्या वर्गांत मोडतात; यांनाच शुद्ध कल्पित कथा असें म्हणतां येईल. ऐतिहासिक तऱ्हेच्या कादंबऱ्यांचा दुसरा वर्ग होय. या देशकालादि गोष्टींनीं परिच्छिन्न असून त्यांत सांप्रत कालांत अनुभवास येणाऱ्या अनेक परिस्थितींचें व घोंटाळ्यांच्या प्रसंगाचें चित्र रेखाटलेलें असतें. प्रेमबंधन, विचित्रपुरी, मंजुघोषा, मुक्तामाला, मोचनगड, वेषधारी पंजाबी, अनाथ पांडुरंग, नारायणराव आणि गोदावरी वगैरे पहिल्या वर्गांतील नमुनेदार कादंबऱ्या होत. नागेशराव बापट, आणि हरि नारायण आपटे यांचे ग्रंथ दुसऱ्या प्रकारच्या कादंबऱ्यांचीं उत्कृष्ट उदाहरणें आहेत. रा. आपटे यांच्या 'पण लक्ष्यांत कोण घेतो' आणि 'आज कालच्या गोष्टी' व बापटांच्या 'बाजीराव पेशवा' आणि 'पानिपतची मोहिम' या कादंबऱ्या विशेष नांवाजण्यासारख्या आहेत. नाटकाप्रमाणेंच कादंबऱ्यांकडेही आमच्या पदवीधरांचें लक्ष वेधलेलें दिसत नाहीं. सरकारी यादींत ज्या १२० कादंबरीकारांचीं नांवें आढळतात त्यांत–रानडे, कानिटकर, आगाशे, भिडे, कृष्णराव माधव, आणि गुंजीकर या सहा सात

पदवीधरांचीच नांवें क़ायतीं दिसून येतात. परंतु आमचे उत्तम कादंबरीकार युनिव्हर्सिटी शिक्षण न मिळालेल्या अगर तें पूर्ण न झालेल्याच वर्गांतले आहेत. रा. हरी नारायण आपटे व नागेशराव बापट हे आमच्यांतील अत्यंत लोकप्रीय आणि अतिशय नामांकित कादंबरीकार होत. रा. हाळवे, रिजबूड, योगी, कानिटकर वगैरे लेखक आपापल्या परीनें श्रेष्टच आहेत. पदवीधर लोकांस योग्य उद्योगधंदा मिळत नाहीं अशी एकसारखी सर्व बाजूंनीं ओरड ऐकूं येत असतां व त्यांच्याहून निदान लोकदृष्ट्या तरी कमी शिकलेल्या त्यांच्या कित्येक लोकबांधवांस ग्रंथकाराचा धंदा आपल्यापरी चांगला किफायतशीर होत असतां त्यांच्यापैकीं इतक्या थोड्या मंडळीचेंच लक्ष त्या धंद्याकडे लागावें याचें विशिष्ट कारण काय आहे हें समजत नाहीं. जुन्या ग्रंथांचे प्रकाशक, भाषांतरकार, अथवा निरनिराळ्या विषयांवर स्वतंत्र ग्रंथ लिहिणारे यांची ठोकळ संख्या निदान ७०० हून कमी नाहीं; परंतु यांत पदवीधर ६० किंवा ७० च आहेत ह्मणजे त्यांचें प्रमाण १:१० असें पडतें. हा दोष कोणत्याही व्यक्तीचा नसून ज्या पद्धतीनें त्यांना शिक्षण दिलें जातें त्या पद्धतीचा आहे. त्यांच्या शिक्षणक्रमांत परभाषेसच सर्वथैव महत्व दिलें गेलें असल्यामुळें स्वभाषेचें अध्ययन करून राष्ट्रीय वाङ्मयांत भर टाकण्याच्या बुद्धीचा त्यांच्यामध्यें अत्यंत अभाव असतो. या बेपर्वाईचा व निष्काळजीपणाचा दिवसेंदिवस अधिकच प्रादुर्भाव होत चालला आहे, एवढेंच काय तें सार वरील आंकड्यावरून निष्पन्न होतें, ही मोठी दुःखाची गोष्ट होय.

## सामान्य गद्य वाङ्मय.

शालोपयोगी पुस्तकें वजा जातां रिपोर्टांत भाषाविषय या सदराखालीं मोडणारीं पुस्तकें पुष्कळ असून त्यांची संख्या सुमारें १५० आहे. यांपैकीं वाङ्मयाच्या दृष्टीनें व अन्य बाजूंनीं उत्कृष्ट अशीं सुमारें ५० आहेत. पंडिता रमाबाई, व रा. पावगी यांचीं पुस्तकें व कर्सनदास मूळजींच्या इंग्लंड व इंग्रज यांच्या हकीकतीचें रा. भागवतांनीं केलेलें भाषांतर अशीं तीन पुस्तकें प्रवास या सदराखालीं येतात; व हींच काय तीं या विषयांत नांव घेण्यासारखीं पुस्तकें होत.

रा. बापट यांचें सद्वर्तन, मधुमक्षिका, आणि शिरस्तेदार, नागेशराव बापट यांचा दादोजी कोंडदेव, आगरकरांचे केसरींतील, सुधारकांतील व इतर पत्रांतील निवडक निबंध, गोळे यांचें ब्राह्मण आणि त्यांची विद्या, रा. चिं. वि. वैद्य

यांची 'अबलोन्नति लेखमाला' रा. नाना पावगी यांचें भारतीय साम्राज्य, कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांची निबंधमाला, आणि कविपंचक, बर्वे यांची ठगाची जबानी, पंडिता रमाबाई यांची स्त्रीधर्मनीति, वागळे यांचे बेकनचे निबंध, राजाराम शास्त्री भागवत यांचे मरठ्यांविषयीं चार उद्गार व महाराष्ट्रधर्म, उदास यांचें धौममहाबळेश्वरवर्णन, गाडगीळ यांचें संसारसुख, बाळासाहेब देव यांचें सिसरोचें भाषांतर, आणि रेव्ह. बाबा पदमनजींचें साहित्य शतक व यमुनापर्यटन, हीं व अशीं आणखीं कांहीं पुस्तकें गद्यांत सामान्य वाचकांस वाचण्यासारखीं आहेत. आतां धर्म व प्रवास या सदराखालच्या पुस्तकांच्याच विचार करणें राहिलें आहे. वर सांगितलेल्या तीन पुस्तकांखेरीज हें सदर अगदीं कोरें पडलें असून त्यांत प्रस्तुत रिपोर्टाच्या पूर्वीच्या तीस वर्षांत कांहीं एक भर पडलेली नाहीं. काशी, रामेश्वर, गोकर्णमहाबळेश्वर इ. यात्रांच्या वर्णनांची दुसरीं पुस्तकें या सदराखालीं येतात. परंतु वाङ्मयदृष्ट्या त्यांचें महत्व कांहीं नाहीं. धर्म या विषयावरील पुस्तकांसंबंधानें कांहीं सांगण्याचें कारण दिसत नाहीं. त्यांची संख्या खरोखर मोठी आहे खरी, पण तीं आळवावरच्या पाण्याप्रमाणें क्षणिक, वाङ्मयदृष्ट्या कुचकिंमतीचीं व वेडगळ धर्मसमजुतींनीं भरलेलीं अशीं आहेत. संकीर्ण विषयांवरील पुष्तकांची संख्या सर्व पुस्तकांच्या एक चतुर्थांश आहे व त्यांविषयीं विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं. त्यांत बऱ्याचशा शालोपयोगी पुस्तकांचा समावेश झाला आहे.

मासिकें व वर्तमानपत्रें यांविषयीं दोन शब्द सांगणें जरूर आहे. लोकाश्रय संपादण्यास प्रयत्न करणाऱ्या मासिकांची सर्व संख्या सध्यां १५ आहे. विविधज्ञानविस्तार, ग्रंथमाला, भाषांतर, भारतवर्ष, ऐतिहासिक लेखसंग्रह, केरळकोकिळ आणि बालबोध, हीं मासिकें अत्यंत प्रसिद्ध असून फारच उत्कृष्ट रीतीनें चालविलीं जात होतीं. ग्रंथमाला, भारतवर्ष ऐतिहासिक लेखसंग्रह व भाषांतर यांचे संपादक अनुक्रमें, प्रो. विजापूरकर, रा. आपटे आणि पारसनीस, वासुदेव शास्त्री खरे, व राजवाडे हे होत. तरुण ग्रंथकारांस उत्तेजन देण्याच्या कामीं हीं मासिकें फार उपयोगाचीं होतीं खरीं परंतु त्यांचा खप फारच थोडा होता.

वर्तमानपत्रांसंबंधानें विचार करितां त्यांची संख्या फारच मोठी म्हणजे सुमारें १०० असून त्यांत ३ दैनिक आहेत. बाकीचीं साप्ताहिक आहेत. प्रत्येक जिल्हा शहरांत व कांहीं ठिकाणीं प्रत्येक तालुका शहरांत एक अथवा अधिक

वर्तमानपत्रें आहेत. रिपोर्टाच्या पूर्वीच्या तीस वर्षांत चालू असलेल्या स्थितीशीं तुलना करितां असें दिसून येईल कीं, या देशांत वर्तमानपत्रांची जशी प्रगति झाली आहे तशी स्पष्टपणें दिसून येणारी प्रगति कोणत्याही वाङ्मयात्मक चळवळींत झालेली नाहीं. या ठिकाणीं वर्तमानपत्रांचा विचार फक्त वाङ्मयाच्याच दृष्टीनें करावयाचा आहे आणि त्या बाबतींत झालेली प्रगति चांगली उत्साहजनक आहे. सुमारें १६ उत्तम वर्तमानपत्रांच्या वर्गणीदरांची संख्या हजारांवर आहे; परंतु तीस वर्षांपूर्वी १०० वर्गणीदार सुद्धां मिळण्यास मोठी मारामार पडे. कांहीं वर्तमानपत्रकर्त्यांच्या पदरीं फार बुद्धिवान् माणसें आहेत व कांहीं संपादकांस आपल्या श्रमाचा चांगलाच मोबदला मिळतो. तथापि, छापखान्यांतील लोकांस पुरेसें काम मिळत नाहीं सबब त्यांस तें मिळावें, ह्मणूनच वर्तमानपत्र काढण्याचें धाडस केल्याचीं उदाहरणें पुणें मुंबई शिवाय इतर ठिकाणच्या वर्तमानपत्रांत पुष्कळ आढळून येतात; व अशा पत्रांचे नामधारी संपादक बेताबाताचेच शिकलेले असून त्यांस पगारही अगदीं थोडाच मिळतो, ही गोष्ट सांगितल्या खेरीज रहावत नाहीं.

हें पर्यालोचन पुरें करण्यापूर्वी कांहीं स्त्रीग्रंथकारांचा थोडासा उल्लेख करणें जरूर आहे. पंडितारमाबाई ह्या त्यांमध्यें अग्रणी होत. आनंदीबाई जोशी यांचें चरित्र लिहिणाऱ्या सौ. काशीबाई कानिटकर ह्या त्यांच्या खालोखाल येतात. पुष्पकरंडक पुस्तककर्त्री मिस भोर, सौ. सावरकर, गोदावरीबाई पंडित, काशीबाई, पार्वतीबाई आणि रुक्मिणीबाई यांचाही नामनिर्देश करण्यासारखा आहे. एका स्त्रीनें तर ‘ आर्यभगिनी ’ हें पत्र पुष्कळ वर्षें चालविल्याचें आढळतें.

ह्या पर्यालोचनावरून मराठी वाङ्मयाच्या एकंदर व्याप्तीची व भिन्न भिन्न शाखांची साधारणपणें पूर्ण कल्पना होते खरी, परंतु ह्या पूर्वीच्या तीस वर्षांत प्रसिद्ध झालेले जुने गद्यपद्य ग्रंथ, भाषांतरें, आणि स्वतंत्र ग्रंथ, काय दर्जाचे व किती योग्यतेचे आहेत हा पुढचा प्रश्न अद्यापि तसाच राहिला, असें कोणी प्रतिपादन करील, तर ही गोष्ट खरी आहे. परंतु ह्या प्रश्नाचें उत्तर निरनिराळ्या सदरवारींतील ग्रंथाचें विवेचन करितांना येऊन गेलेंच आहे. या विषयाचा विशेष परिचय नसलेल्या माणसांस रा. ब. रानडे यांनीं वर दिलेलें मत कदाचित् एका विशिष्ट व्यक्तीचें आहे, अतएव त्यास विषेश महत्व

देतां येत नाहीं, असें वाटण्याचा संभव आहे; तथापि या आक्षेपाचें निरसन करण्यासाठीं रा. ब. रानडे यांनीं कांहीं प्रसिद्ध पदवीधर व बिनपदवीधर ग्रंथकार व मर्मज्ञ यांजकडून उत्कृष्ट १०० मराठी पुस्तकांच्या यादी मागविल्या; व निवडलेलीं पुस्तकें युनिव्हर्सिटीनें इंग्रजी अथवा दुसऱ्या भाषांच्या अभ्यासक्रमांत नेमलेल्या पुस्तकांच्या तोलाची होतां होईतों असावीं अशी त्यांस सूचना केली होती. त्यांच्या विनंतीप्रमाणें खालीं नमूद केलेल्या गृहस्थांकडून नऊ यादी आल्याः—

(१) रावबहादूर. के. एस. मराठे एम. ए. एलएल. बी.. अनेक शास्त्रीय शिशुबोधांचे कर्ते.

(२) रा. सा. गो. वा. कानिटकर. बी. ए. एलएल. बी. म्याक्समूलर-व्याख्यानमाला व मिल्लच्या ग्रंथांचें भाषांतरकार आणि उत्तम कवि.

(३) प्रो. चिं. गं. भानु. बी. ए. स्पेन्सरचे भाषांतरकार व इतरग्रंथकर्ते.

(४) प्रो. विजापुरकर एम. ए. राजाराम कॉलेज येथील संस्कृत अध्यापक व एका वाङ्मयविषयक मासिकाचे संपादक.

(५) रा. ग. ज. आगाशे बी. ए. धुळें हायस्कूलचे हेडमास्तर, अर्थशास्त्रावरील एका ग्रंथाचे कर्ते व मार्मिक टीकाकार.

हे पांच पदवीधर आहेत. दुसरे चार येणें प्रमाणें आहेतः—

( १ ) रा. वि. कों. ओक. डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर आणि प्रसिद्ध ग्रंथकार.

( २ ) रा. राजारामशास्त्री भागवत, मराठा हायस्कुलचे प्रिन्सिपाल, पुष्कळ ऐतिहासिक ग्रंथाचे कर्ते व उत्तम संस्कृतज्ञ.

( ३ ) वासुदेव शास्त्री खरे, ' नाना फडणवीस ' व ' यशवंत महाकाव्य ' यांचे कर्ते असून एका ऐतिहासिक मासिकचे संपादक.

( ४ ) रा. खरे आणि ह. कृ. दामले, पहिले मराठी व्याकरणकार, गलिव्हर्स ट्राव्हल्सचे भाषांतरकार व इतर ग्रंथ लिहिणारे.

या गृहस्थांनीं आपल्या मित्र मंडळीचें मत घेऊन आपल्या यादी कायम केल्या आहेत

कै. कृष्णाजी परशुराम गाडगीळ यांनीं आपल्या ' संसारसुख ' या पुस्तकांत अगोदरच अशी एक याद दिलेली आहे. या निरनिराळ्या दहा यादी रा. ब.

रानडे यांनीं फार काळजीपूर्वक तपासून एकमेकांशीं ताडून पाहिल्या. व ह्या दहा गृहस्थांचीं प्रत्येक पुस्तकासंबंधानें मतेंही घेऊन ठेविलीं आहेत. त्यावरून असें दिसून येतें कीं ३० जुने व १० नवे मिळून ४० पद्यग्रंथ, ३० चरित्रात्मक ग्रंथ, ३० इतिहास व बखरी, ३० कादंबऱ्या, ३० नाटकें, २५ निबंध, व सुमारें १२ शास्त्रीयविषयक मिळून २०० पुस्तकांस वर सांगितलेल्या गृहस्थांपैकीं दोन अथवा अधिक गृहस्थांची पसंती मिळून उत्कृष्ट अशीं ठरतात. तीन अथवा अधिक गृहस्थांची पसंती पाहिली असतां ही संख्या १५० होते; आणि पांच अथवा सहा जणांच्या पसंतीस उतरणारीं अशीं २० पद्य व ४० गद्य मिळून ६० पुस्तकें आढळतात.

## **भाग ५ वा** ( सारांश )

पांच अथवा अधिक अशा विद्वान् ग्रंथकारांनीं पसंत केलेल्या ज्या ६० पुस्तकांचा मागील भागांत उल्लेख केला आहे तीं येणेंप्रमाणें:—

### कविता.

| | | |
|---|---|---|
| १ | नलोपाख्यान. | रघुनाथपंडित. |
| २ | रामविजय. | श्रीधर. |
| ३ | हरिविजय. | ,, |
| ४ | महाभारत. | मुक्तेश्वर. |
| ५ | केकावली. | मोरोपंत. |
| ६ | महाभारत. | ,, |
| ७ | यथार्थदीपिका. | वामन. |
| ८ | ज्ञानेश्वरी. | ज्ञानदेव. |
| ९ | भागवत. | एकनाथ. |
| १० | अमृतानुभव. | ज्ञानदेव. |
| ११ | लावण्या. | रामजोशी. |
| १२ | दासबोध. | रामदास. |
| १३ | मनाचे श्लोक. | ,, |
| १४ | अभंगाची गाथा. | तुकाराम. |
| १५ | राजाशिवाजी. | कुंटे. |
| १६ | पोंवाडे. | शालिग्राम ( प्रकाशक. ) |
| १७ | गंगावर्णन. | चिंतामणी पेठकर. |

## चरित्रें.

| | | |
|---|---|---|
| १८ | एकनाथ. | सहस्त्रबुद्धे. |
| १९ | संभाजी आणि राजाराम. | भागवत. |
| २० | राणी लक्ष्मीबाई. | पारसनीस. |
| २१ | आनंदीबाई जोशी. | सौ. कानिटकर. |
| २२ | साक्रेतीस. | चिपळूणकर. |
| २३ | नाना फडणवीस. | खेर. |
| २४ | परशरामभाऊ पटवर्धन. | निगुडकर. |
| २५ | जार्ज वाशिंगटन. | व्हि. पि. रानडे. |
| २६ | महादजी शिंदे. | नातु. |
| २७ | पृथ्विराज चव्हाण. | गो. ह. देशमुख ( लोकहितवादी. ) |

## इतिहास.

| | | |
|---|---|---|
| २८ | संयुक्त संस्थानें. | पंडिता रमाबाई. |
| २९ | पेशव्यांचीबखर. | सोहोनी. |
| ३० | भाऊसाहेबांची बखर. | ,, |
| ३१ | मराठ्यांचा इतिहास. | ग्रांटडफचें भाषांतर. |

## कादंबऱ्या.

| | | |
|---|---|---|
| ३२ | मी ...................... | आपटे. |
| ३३ | आजकालच्या गोष्टी. | ,, |
| ३४ | पण लक्षांत कोण घेतो. | ,, |
| ३५ | अनाथ पांडुरंग. | ,, |
| ३६ | प्रेमबंधन. | योगी. |
| ३७ | ठगाची जबानी. | बर्वे. |
| ३८ | बाजीराव पेशवा. | ना. बापट. |
| ३९ | पानपतची मोहीम. | ,, |
| ४० | मुक्तामाला. | हळबे. |
| ४१ | मोचनगड. | गुंजीकर. |

## नाटकें.

| | | |
|---|---|---|
| ४२ | शापसंभ्रम. | देवल. |
| ४३ | जयपाळ. | वि. ज. कीर्तने. |

| | | |
|---|---|---|
| ४४ | थोरले माधवराव पेशवे. | वि. ज. कीर्तने. |
| ४५ | विकारविलसित. | आगरकर. |
| ४६ | मृच्छकटिक. | प. गोडबोले. |
| ४७ | विक्रमोर्वशीय. | ,, |
| ४८ | वेणीसंहार. | ,, |
| ४९ | उत्तररामचरित्र. | ,, |
| ५० | त्राटिका. | केळकर. |
| ५१ | शाकुंतल. | किर्लोस्कर. |

**शास्त्रें.**

| | | |
|---|---|---|
| ५२ | ज्योतिर्विलास. | दीक्षित. |
| ५३ | अनेकविद्यामूलतत्व. ...... | चिपळूणकर. |

**निबंध आणि प्रवास.**

| | | |
|---|---|---|
| ५४ | बेकनचे निबंध. | वागळे. |
| ५५ | निबंध माला. | चिपळूणकर. |
| ५६ | रासेलस. | बापट. |
| ५७ | भारतीयसाम्राज्य. | नानापावगी. |
| ५८ | विलायतचा प्रवास. | रा. भ. पावगी. |
| ५९ | धौममहाबळेश्वरवर्णन. | उदास. |
| ६० | केंसरींतील निबंध. | आगरकर. |

वरील यादींत कवितेखालीं १७ पुस्तकें दाखविलीं आहेत, तरी नाटकांपैकीं तीन कवितेंतच गणिलीं पाहिजेत. मोरोपंती महाभारताची जरी एकच ग्रंथ ह्मणून गणना केली आहे, तरी महाभारताचीं १८ पर्वें ह्मणजे प्रचंड १८ ग्रंथच होत. हेंच विधान अंशतःमुक्तेश्वरास लागू पडतें. निरनिराळ्या विषयांत उपयुक्त व महत्वाचीं ह्मणून या पुस्तकांची निवड केलेली नसून वाङ्मयदृष्ट्या जेवढीं उत्कृष्ट वाटलीं तेवढींच निवडलेलीं आहेत. सांप्रत दुसऱ्या भाषांच्या अभ्यासक्रमांत नेमिलेल्या पुस्तकांच्या व कांहीं इंग्रजी पुस्तकांच्याही जोडीस बसविण्याच्या योग्यतेचीं व गद्यपद्यांत नमुनेदार ह्मणून जीं पुस्तकें वर निवडून दिलीं आहेत त्यांच्या उत्कृष्टतेविषयीं ज्या कोणास शंका वाटत असेल त्यांची, या तज्ज्ञमंडळीच्या पूर्ण विचार करून दिलेल्या मताच्या अवलोकनानें, संशयनिवृत्ति खास होईल.

रिपोर्टाच्या पूर्वीच्या ३२ वर्षांत झालेल्या मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीचें पर्यालोचन येथें पूर्ण झालें.

या विवेचनावरून ज्या गोष्टी निष्पन्न होतात त्यांचा सारांश येणें प्रमाणें आहे:—

(१) ज्या वेळीं युनिव्हर्सिटीनें आर्टस कोर्समधील वरच्या परिक्षांच्या अभ्यासक्रमांत देशी भाषांऐवजीं संस्कृतादि अभियुक्त व पुरातन ( classics ) भाषा घातल्या त्या वेळीं नांव घेण्यासारखे असे फारच थोडे गद्य ग्रंथ होते; व त्यांची एकंदर संख्याही फार थोडी होती, पद्यग्रंथ उत्तम प्रतीचे असून पुष्कळही होते; त्यावेळीं वरील फेरफार घडवून आणण्याचा पक्ष ज्यांनीं उचलला होता त्यांनीं मराठी कविता ही जुन्या उत्कृष्ट संस्कृत कवितेची केवळ छाया अथवा प्रतिध्वनि आहे असें मानण्यांत चुकी केली, पण मराठी गद्य ग्रंथांची उणीव हें कारण मात्र तो फेरफार करण्यास अगदीं सयुक्तिक होतें असें ह्मणावें लागतें.

(२) परंतु १८६४–१८९४ च्या मधील गेलेल्या तीस वर्षांत ही वस्तुस्थिति बरीच पालटली सन १८६४ पर्यंत छापून निघालेल्या सर्व गद्यपद्य-ग्रंथांचीं संख्या,—शालोपयोगी पुस्तकें खेरीज करून,—पाचशेंपासून सहाशें पर्यंत होती. परंतु पत्रकें, मासिकें, व संकीर्ण पुस्तकें खेरीज करून हीचसंख्या १८९४ पर्यंत ८००० पर्यंत गेली; व यांपैकीं ७००० ग्रंथ वरील तीस वर्षांत प्रसिद्ध झालेले आहेत. या ३० वर्षांपूर्वीं ग्रंथसंख्येचें जें मान होतें तें १८९४ मध्यें १५ पटीनें वाढलें हें ह्यावरून दिसून येईल.

(३) ही ग्रंथसंख्याच केवळ अवाढव्य प्रमाणानें वाढली आहे असें नाहीं, तर पद्याचें गद्यवाङ्मयाशीं, त्याचप्रमाणें स्वतंत्र ग्रंथांचें पुनरावृत्त व भाषांतरात्मक ग्रंथाशीं, व शालोपयोगी पुस्तकांचें सामान्य वाङ्मयाच्या ग्रंथांशीं, प्रमाण इतकें वाढलें आहे कीं, लोकांमध्यें वाङ्मयाची कळकळ किती वाढली आहे ह्याची खात्रीलायक साक्ष त्यावरून पटते.

(४) पुरातन गद्यपद्यग्रंथांचा जीर्णोद्धार यासंबंधानें बिनधास्त इतकें ह्मण-ण्यास हरकत नाहीं कीं जीं १२०० पुस्तकें या सदराखालीं येतात

त्यांत जुन्याकवितेंत व ऐतिहासिक बखरींत जेवढा अत्यंत महत्त्वाचा म्हणून भाग आहे तेवढा आला आहे.

( ५ ) भाषांतररूपानें झालेल्या ग्रंथाची संख्या सुमारें १००० आहे. त्यांत उत्कृष्ट संस्कृत व इंग्रजी ग्रंथांचें साहाय्य जरी बहुधा सारखेंच झालें आहे तरी त्यांतल्यात्यांत संस्कृतांचें कांकणभर जास्त झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकविसाहून अधिक अशा पहिल्या प्रतीच्या इंग्रजी ग्रंथाची व संस्कृतांतल्या बहुतेक सर्व उत्तम नाटक-कादंबऱ्यांच्या भाषांतरांची भर पडून मराठी भाषेची अभिवृद्धि फार चांगली झाली आहे.

( ६ ) चरित्र, इतिहास, राजनीति, कायदा, वैद्यक, आणि भौतिकशास्त्रें ह्या विषयांचीं सदरें १८६४ सालपर्यंत अगदीं कोरीं होतीं; परंतु पुढील ३० वर्षांत त्या सदराखालीं बऱ्याच योग्य ग्रंथाचा समावेश झाला आहे. नाटकें, कादंबऱ्या व निबंध या विषयांत झालेली प्रगति तर ह्याहूनही आधिक समाधानकारक आहे.

( ७ ) मराठी वाङ्मयाच्या त्यावेळच्या स्थितीवरून त्यांत गद्यपद्य ग्रंथाचा भरणा पुष्कळ झाला होता असें ह्मणण्यास कोठलीही हरकत दिसत नाहीं; व हीं पुस्तकें तज्ज्ञ लोकांच्या मतें युनिव्हर्सिटीनें नेमिलेल्या जरी कांहीं इंग्रजी पुस्तकांच्या तोडीची नसलीं, तरी दुसऱ्या भाषांच्या अभ्यास-क्रमांत नेमिलेल्या पुस्तकांच्या तोडीचीं तीं अगदीं निःसंशय आहेत.

( ८ ) मराठी वाङ्याची जी ही विलक्षण वाढ झाली आहे तींत कांहीं दोष-ही आहेत. पहिला दोष ह्मटला ह्मणजे त्याची वाढ सर्व दिशेनें सारखी झालेली नाहीं; व योग्य मार्गदर्शक नसल्यामुळें त्या वाढींत व्यवस्थितपणाही मुळींच दिसून येत नाहीं.

( ९ ) शास्त्रीय ग्रंथांचीं अथवा शेक्सपीयरच्या नाटकांचीं भाषांतरें अथवा रूपांतरें करण्याच्या बाबतींशिवाय युनिव्हर्सिटीचे ग्राजुएटांनीं—बोटा-वर मोजण्याइतकीं कांहीं अपवादात्मक उदाहरणें एकीकडे ठेविलीं तर—कांहीं एक न करण्यांतच प्रासिद्धि मिळविली आहे, ही दुसरी निराशेची गोष्ट होय. तेव्हां मराठी भाषेच्या अभिवृद्धर्थ झटल्याचें

श्रेय युनिव्हर्सिटी शिक्षण अथवा पदव्या न मिळालेल्याच ग्रंथकारांस सर्वतोपरी दिलें पाहिजे. उत्तम कादंबरीकार, उत्तम नाटककार, उत्तम चरित्रकार, उत्तम इतिहासकार, उत्तम कवि, उत्तम निबंधकार, वर सांगितल्या प्रमाणेंच, कांहीं अपवाद खेरीज करून, युनिव्हर्सिटीच्या कृपाप्रसादास पात्र न झालेल्याच मंडळींतले आहेत.

(१०) मराठी बद्दल कळकळ नसणें हा आमच्या मंडळींत एक सामान्य दोष आहे असें नसून, तिजबद्दल दिसून येणारी बेपर्वाई मात्र दिवसेंदिवस अधिकाआधिक वाढत जात आहे. सामान्यतः सांगावयाचें ह्मणजे आमच्या मुलांची इंग्रजीस प्रारंभ होतांच, ह्मणजे सुमारें बाराव्या वर्षीच मराठींशीं फारखत होते. यामुळें त्यांचा आपल्या लोकांशीं असलेला संबंधच वस्तुतः तुटल्यासारखा होतो. आणि त्यांपैकीं पुष्कळांना पदवी प्राप्त होई तों लेखन वाचन व संभाषण इत्यादि गोष्टी प्रचलित मातृभाषेच्या द्वारें करण्याचीही मोठी मारामार पडते. या परिचयाच्या अभावामुळें त्यांच्यांत मातृभाषेबद्दल अनादर उत्पन्न होतो, व ज्या पद्धतीच्या द्वारा आपल्या मातृभाषेंत दोन वाक्यें सुद्धां नीटपणें व शुद्धरीतीनें बोलतां व लिहितां येत नाहीं असे सुशिक्षित लोक निपजतात, त्या शिक्षणपद्धतीबद्दल लोकांस सहानुभूतिही वाटेनाशी होते यांत नवल तें कसलें ?

शिक्षणखातें आणि युनिव्हर्सिटी ही स्थापन करण्यांत सरकारचा मुख्य उद्देश युरोपीय ज्ञानाचा फैलाव करणें हा होता, हें त्यांनीं आपल्या १८५४ च्या खलित्यांत स्पष्टपणें जाहीर केलें आहे. हा ज्ञानप्रसार इंग्रजी भाषा व देशीभाषा यांच्या द्वारा व्हावा हा हेतुही त्यांनीं त्यांत दर्शविला होता. देशीभाषांच्या अभिवृद्ध्यर्थ त्या त्या भाषांत प्रोफेसरांच्या जागा ठेवावयाच्या व अशीच सोय संस्कृत व इतर अभियुक्त भाषांसंबंधीं ही साधल्यास करावयाची असा आमचा संकल्प आहे असें सरकारांनीं विदित केलें होतें. आमच्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांस इंग्रजी शिकण्याबद्दल जें उत्तेजन द्यावयाचें, तें केवळ देशी भाषांची जागा सर्वतोपरी इंग्रजीनें पटकावावी ह्मणून द्यावयाचें नसून, युरोपांतील प्रगतीच्या अवलोकनानें आणि भाषांतरांनीं अथवा स्वतंत्र ग्रंथद्वारा आपल्या मातृभाषेची अभिवृद्धि
णून द्यावयाचें असें सरकारच्या मनांत होतें.

युनिव्हर्सिटिपद्धतीनें दिल्या जाणाऱ्या शिक्षणाला जर ही कसोटी लाविली तर युनिव्हर्सिटीच्या हातून तिचा मुख्य हेतु बऱ्याच अंशीं मुळींच सिद्धीस जात नाहीं असें ह्मणण्याची पाळी येते.

इतर बाबतींत कितीही मतभेद असला, तरी हिंदीयुनिव्हर्सिट्या व त्यांतून बाहेर पडणारे ग्राज्युएट्स यांची देशी भाषांशीं जी फारखत झाली आहे, हें एक घोर संकट ओढवलें आहे, या गोष्टींत मतभेदाला बिलकुल जागा दिसत नाहीं. ह्या संकटाच्या निवारणार्थ अनेक उपाय सुचविलेले आढळतात; परंतु त्यांची छाननी करीत बसण्याचें हें स्थल नव्हे. युनिव्हर्सिटीपुढें हा प्रश्न अनेक वेळां आला आहे. संस्कृतादि जुन्या भाषा ठेवाव्या कीं देशी भाषा ठेवाव्या हा कांहीं आतां वादाचा मुद्दा नाहीं; कारण त्यांना इंग्रजी बरोबरच महत्व मिळालें असून या दोन्हीही भाषांचें ( संस्कृत व इंग्रजी ) ज्ञान आपल्या देशीभाषांच्या उत्कर्षार्थ कळकळीनें झटणाऱ्या माणसास असणें अगदीं अत्यावश्य आहे. आतां प्रश्न एवढाच आहे कीं संस्कृतादि जुन्या भाषा व इंग्रजी, हे विषय आहेत तसेच कायम ठेवून विद्यार्थ्यांना मातृभाषेच्या अध्यनाची अभिरुचि कशी लागावी. या दृष्टीनें विचार केला असतां १८६२–६३ सालीं झालेल्या वादविवादांचें व्यावहारिक महत्व बरेंच कमी होतें. १८८८ मध्यें जेव्हां हा प्रश्न पुन्हा उपस्थित झाला तेव्हां आर्टस् मधील डिग्री घेणाऱ्या विद्यार्थ्यांस देशीभाषांत भाषांतर व निबंधलेखन हे विषय ठेवावे अशा सूचना झाल्या होत्या. युनिव्हर्सिटीनें नेमिलेल्या कमिटीनें आपल्या ठरावांत ही सूचना दाखल केली होती व कै. न्या. तेलंग यांनीं ही सूचना पुढें आणण्याचा पतकर घेतला होता. परंतु एकंदर डावपेंचांत कांहीं चूक झाल्यामुळें सगळाच बेत फसला; व दुसऱ्या भाषेंतील पुस्तकांबरोबर आणखी एक देशीभाषांपैकींहि पुस्तक असावें ही रा. मोडकांनीं केलेली सूचना थोड्याशा बहुमतानें नामंजूर झाली. पुढें सन १८९४ सालीं कै. न्या. म. गो. रानडे यांनीं हाच प्रश्न पुनः पुढें मांडला; आणि त्यांची सूचना फॅकल्टी आणि सिंडीकेट यांस मान्यही झाली, परंतु भाषांतराच्या ओझ्यानें विद्यार्थी चिरडून जातील, व ज्यांस मातृभाषा नाहीं अशा विद्यार्थ्यांस त्यापासून फार तोटा होईल व केवळ भाषांतरानें वाङ्मयाच्या अध्ययनाची गोडी लागेल असेंही नाहीं, अशा सबबींवर सेनेटनें आपलें अनुकूल मत देण्याचें

नाकारिलें. त्यानंतर बी. ए. व एम. ए. परिक्षांत ज्या ऐच्छिक दुसऱ्या भाषा आहेत त्यांबरोबरच देशी भाषाही घालाव्या ह्मणून एक नवीन सूचना युनिव्हर्सिटीपुढें आली व तिला सुमारें ५४ फेलोंचें अनुमोदनही मिळालें. ह्याप्रकरणासंबंधीं व्हाइस च्यान्सेलरांस पाठविलेलें पत्र भाषांतररूपानें या टिपणाच्या पुरवणींत दिलें आहे.

या पत्राचें अवलोकन केलें असतां, पूर्वींचे वादग्रस्त मुद्दे अजिबात गाळले आहेत, असें दिसून येईल. अभ्यासक्रमांत फेरफार करण्यासाठीं ज्या सूचना केल्या आहेत त्यांत इंग्रजी व संस्कृतादि जुन्या भाषा पूर्ववत् कायम ठेविल्या असून कोणाच्या डोक्यावर जुलमानें ओझेंही लादलेलें नाहीं, तर त्याच्या योगानें सर्वांचें स्वातंत्र्य सारखें कायम राहिलें असून कांहीं ग्राज्युएटांचें इंग्रजी व संस्कृतादि भाषांकडे कोणत्याहि प्रकारें दुर्लक्ष न होतां त्यांचें मन देशीभाषेंतील वाङ्मयाच्या अध्ययनाकडे लागेल अशी त्यांत योजना केली होती. युनिव्हर्सिटीच्या फेलोंना ह्या प्रश्नाची पूर्ण माहिती मिळावी व त्याचा त्यांस योग्य निर्णय करितां यावा या हेतूनें कै. न्या. रानडे यांनीं, पुढें पुरवणींत दिलेलें पत्र लिहिलेलें होतें. असें झाल्या मुळें ज्याकोणास, ‘ मराठी भाषाही त्यावेळीं इतर दुसऱ्या भाषांबरोबर ऐच्छिक भाषा ठेवण्याच्या लायखीची होती कीं नाहीं ’ या प्रश्नाचा विचार असद्‌ग्रहग्रस्त न होतां सरळ मनानें करावयाचा होता, त्यांस तसें करण्यास चांगलें साधन झालें; व त्यावरून त्या प्रश्नाचा निकाल लावण्याची योग्य वेळ आल्यावर फेलोमंडळी त्या प्रश्नाच्या योग्यायोग्यतेकडे लक्ष देऊन निकाल देतील अशी आशा रावबहादुरांस वाटत होती.

## पुरवणी.

दि आनरेबल ई. टी. क्यांडी. व्हाईसच्यान्सेलर

मुंबई युनिव्हर्सिटी यांचे हुजुरांस.

खालीं सह्या करणार यांजकडून नम्रतापूर्वक अर्ज करण्यांत येतो ऐसाजे. युनिव्हर्सिटीच्या उच्च परीक्षांत देशी भाषांच्या व वाङ्मयाच्या अध्ययनास उत्तेजन मिळावें ह्मणून आह्मी जी सूचना आपल्यापुढें मांडितों आहों तिचा सिंडिकेटकडून व अखेरीस सेनेटकडून योग्य विचार व्हावा अशी आमची नम्र विनंति आहे. या प्रश्नाकडे सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया यांचें लक्ष

वेधलें असून त्यांच्याच सूचनेवरून कांहीं वर्षांपूर्वी मुंबई सरकारानें हा प्रश्न युनिव्हर्सिटीपुढें विचार करण्याकरितां ठेविला होता. ही गोष्ट आपणांस विदित आहेच. ही गोष्ट अमलांत आणण्याकरितां निरनिराळ्या सूचना पुढें आल्या. व सरतेशेवटीं सिंडिकेटनें शिफारस करून या सूचनेचें असें रूपांतर केलें कीं, 'आर्टस कोर्सच्या प्रत्येक उच्च परीक्षेस विद्यार्थ्यांनां स्वभाषेंत निबंध लेखन व भाषांतर हे विषय अवश्य असावेत.' परंतु सेनेटमध्यें ३४ विरुद्ध ४२ मतें पडून ही सूचना थोड्याशा बहुमतानें नापसंत ठरली. सेनेटमध्यें झालेल्या वादविवादावरून असें समजतें कीं ही सूचना अमान्य होण्याचें पहिलें कारण हें कीं तिच्या योगानें अगोदरच जड असलेलें अभ्यासाचें ओझें अधिक जड होईल. दुसरें कारण असें कीं या इलाख्यांत प्रचलित असलेल्या देशी भाषांपैकीं कोणतीच भाषा ज्यांची जन्मभाषा नाहीं अशा विद्यार्थ्यांवर या सूचनेनें विनाकारण जास्त बोजा पडेल. व निबंधलेखन व भाषांतर यांस फारशी विद्वत्ता लागत नसून त्यांच्या योगानें देशी भाषांतील उच्च वाङ्मयास उत्तेजन मिळेल असेंही नाहीं.

(२). आपणांपुढें जो प्रश्न मांडिला आहे त्याबद्दल या युनिव्हर्सिटीच्या पुष्कळ फेलोमंडळीस कळकळ वाटत आहे. ह्मणून वर नमूद केलेला आक्षेप टाळून युनिव्हर्सिटीच्या उच्च परीक्षांत देशी वाङ्मयाच्या अध्ययनास उत्तेजन कसें देतां येईल या प्रश्नाचा विचार पुन्हा करण्यास योग्य काल आतां प्राप्त झाला आहे असें आम्हांस वाटतें.

सिंडिकेटच्यापुढें आम्हीं सूचना जी मांडितों आहों ती येणेंप्रमाणें आहे:—

(१) जे विद्यार्थी बी. ए. च्या परिक्षेस भाषा हा ऐच्छिक विषय घेतात त्यांस संस्कृतादि इतर दुसऱ्या भाषांऐवजी मराठी, गुजराथी, कानडी व हिंदुस्तानी यांपैकीं कोणतीहा भाषा घेण्याची मुभा असावी. या सूचनेच्या योगानें पान ( यु. का व. १८९६ ) ४६ पा. २ नियम ३१ या मध्यें दिलेल्या भाषांच्या यादींत या देशी भाषा नमूद करण्यापलीकडे कसलाही फेरफार करण्याची जरूर पडणार नाहीं.

(२) त्याचप्रमाणें पान ६४ पा. २ नियम ५७ मध्यें फेरफार करून एम. ए. च्या परीक्षेस ऐच्छिक दुसऱ्या भाषांऐवजीं देशी भाषा घेण्याची मुभा विद्यार्थ्यांस मिळावी.

(३) या वैकल्पिक सूचनेच्या योगानें सांप्रत नेमलेल्या अभ्यासांत अधिक भर न पडून विद्यार्थ्यांस वाटेल ती भाषा दुसरी भाषा या नात्यानें

घेण्याची मुभा राहील. दुसरी गोष्ट अशीं कीं सर्व विद्यार्थ्यांना अभ्यासाचा बोजा सारखा पडत नाहीं हा आक्षेप या सूचनेवर आणितां येत नाहीं. ज्यांना मातृभाषा नाहीं व जे ती शिकण्याची पर्वा करीत नाहींत त्यांनां प्राचीन संस्कृतादि अथवा अर्वाचीन फ्रेंच व पर्शियन वगैरे भाषा त्यांच्या मर्जीप्रमाणें घेतां येतीलच. तिसरी गोष्ट अशीं कीं ही सूचना पसंत पडल्यास, खऱ्या विद्वत्तेची कसोटी लागून देशी भाषेंतील उच्च प्रतीच्या वाङ्मयास उत्तेजन मिळेल. पुरातन संस्कृतादि भाषांच्या अध्ययनाच्या आड ही सूचना यावयाची नाहीं; कारण बी. ए. च्या परीक्षेंत त्या भाषा आवश्यक विषयांत घातलेल्या आहेत, ही चौथी गोष्ट होय. यावरून सहज असें दीसून येईल कीं आमच्या सूचना पूर्वी घेतलेल्या आक्षेपांस पात्र नसून त्यांच्यांत कांहीं विशिष्ट फायदाही आहे. या गोष्टींमुळें ती सिंडिकेट व सेनेट यांस पसंत पडेल असें आह्मांस वाटतें.

(४) यावर कांहींचें ह्मणणें असें पडेल कीं विद्यार्थ्यांना विषयांची पसंती करण्याची जी ही मुभा दिली आहे तिचा पुष्कळ विद्यार्थी फायदा घेणार नाहींत व एकंदरींत ही सूचना परीणामीं मोठीशी हितकर होईल असें नाहीं. परंतु, या आक्षेपास आमचें उत्तर असें आहे कीं अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. आणखी आपल्या मातृभाषेंतील उच्च वाङ्मयाचें अध्ययन करणारे जरी थोडेसे विद्यार्थी निघाले तरी ते उत्तम प्रतीचे विद्वान् होऊन त्यांचा पुढें त्यांच्या मातृभाषेच्या अभिवृद्धीच्या कामीं जो उपयोग होईल तो शब्दांनीं सांगता येण्यासारखा नाहीं, व ते अशा रीतीनें आपल्या युनिव्हर्सिटीला ललामभूत होतील. आणखी असें आहे कीं असें केल्यानें युनिव्हर्सिटीनें आपलें कर्तव्य तरी बजावल्यासारखें होईल, व इष्ट हेतू न साधल्यास त्याचा दोष सर्वस्वी लोकांकडेच राहील. हल्लीं कोणत्याही कॉलेजांत या देशी भाषांतील उच्च वाङ्मय शिकविण्याची सोय नाहीं हा आक्षेप आणण्याचें कारण दिसत नाहीं. कारण आमची सूचना पसंत झाली तरच ही उणीव भासणार आहे; आणि ही उणीव योग्य वेळांत कांहीं विशिष्ट देणग्यांनीं व इतर उपायांनीं सहज भरून निघेल. आणखी हा आक्षेप युनिव्हर्सिटीनें इतर भाषा पसंत केल्या आहेत त्यांनांही बरोबरीनेंच लागू पडतो.

येणेंप्रमाणें सर्व गोष्टी आम्हीं आपल्यापुढें ठेविल्या आहेत; तेव्हां वर केलेली आमची सूचना आपण सेनेटच्यापुढें आपल्या शिफारसी–सह ठेवावी व तिजवर त्या मंडळीचा अनुकुल अभिप्राय मिळेल असें करावें अशी आमची आपल्यास नम्र विनंति आहे. प्रथमतः मराठी, गुजराथी, कानडी व हिंदुस्तानीं या भाषा सुरू कराव्या. यासंबंधीं आमच्या वरील सूचना सर्व प्रकारें सोयीच्या असल्यामुळें त्यांचा अनुभव तरी घेऊन पहावयास हरकत नाहीं. असें आह्मांस वाटतें. मेहरबानांस कळावें.

( १ ) म. गो. रानडे.
( २ ) वा. ज. कीर्तिकर.
( ३ ) चिमणलाल ह. सेटलवाड.
( ४ ) का. र. कीर्तिकर.
( ५ ) जमितराम नानाभाई.
( ६ ) भालचंद्र कृष्ण.
( ७ ) ना. ग. चंदावरकर.
( ८ ) गो. का पारख.
( ९ ) कैखुषरू. एन. काब्राजी.
( १० ) नारायण विष्णु गोखले.
( ११ ) काळाभाई लल्लुभाई.
( १२ ) नीलकंठ वि. छत्रे.
( १३ ) जी. बी. प्रभाकर.
( १४ ) कल्याणदास केशवदास मोदी.
( १५ ) आर. एम. सयानी.
( १६ ) अबदुल एम. धरमसी.
( १७ ) आर. डी. सेटना.
( १८ ) रतिराम डि. दवे.
( १९ ) डोसाभाई फ्रामजी.
( २० ) शामराव विठ्ठल.
( २१ ) कृष्णराव ए. चेंबूरकर.
( २२ ) माणिकशा जे. टालीयारखान.
( २३ ) शिवराम व्ही. भांडारकर.
( २४ ) घनश्याम नी. नाडकर्णी.
( २५ ) एफ. आर. व्हीकाजी.

( २६ ) शांताराम व्ही. कंटक.
( २७ ) पुंडलीक गणेश.
( २८ ) एम. एच. हकीम.
( २९ ) मोरेश्वर गोपाळ देशमुख.
( ३० ) प्रेमचंद रायचंद.
( ३१ ) जी. एन. त्रिपाठी.
( ३२ ) शांताराम विठ्ठल.
( ३३ ) नानाभाई आर. राणीना.
( ३४ ) धनजीभाई नवरोजी.
( ३५ ) पुरषोत्तम बी. जोशी.
( ३६ ) नगीनदास टी. मार्फाटीया.
( ३७ ) इब्राहीम अहमदी.
( ३८ ) शेख एफ. एल. मुल्ला.
( ३९ ) हरकीसनदास नरोत्तमदास.
( ४० ) गो. कृ. गोखले.
( ४१ ) त्रिं. क. गज्जर.
( ४२ ) मनसूखराम एस. त्रिपाठी.
( ४३ ) ईस्माएल जान महमद.
( ४४ ) एम. ए. एफ. मूस.
( ४५ ) वि. ना नेने
( ४६ ) जीवनजी जमशेटजी मोदी.
( ४७ ) गणपत स. राव.
( ४८ ) आत्माराम पांडुरंग.
( ४९ ) बदरूदीन तय्यबजी.
( ५० ) दाजी आबाजी खरे.
( ५१ ) नारायण बल्लाळ लिमये.
( ५२ ) वि. ना. पाठक.
( ५३ ) जी ए. मानकर.
( ५४ ) दत्तू जी. सबर्नीस.




---